# प्रथमावृत्तीची प्रस्तावना

दादाभाई नवरोजी यांचें चरित्र अनेक दृष्टींनीं अद्भुत, रम्य व बोधप्रद आहे वय, ज्ञान व तप या तिन्ही दृष्टींनीं त्यांचें चरित्र अलौकिक झालें आत्यंतिक दारिद्र्यांत त्यांच्या चरित्राचा प्रारंभ झाला, व आत्यंतिक लौकिकांत त्यांच्या चरित्राचा शेवट झाला सन १८४७ पासून १९०७ पर्यंतचीं साठ वर्षे त्यांनीं अविश्रांत परिश्रमांत खर्चिलीं, व नंतरचीं दहा वर्षे त्यांनीं अखंड विश्रांतींत घालविलीं देशबांधवांची सेवा करून त्यांनीं हिंदुस्थानांत कीर्ति संपादिली, व राज्यकर्त्यांविरुद्ध चळवळ करून त्यांनीं इंग्लंडांतही नांव गाजविलें त्यांची कीर्ति थोर होती, व मूर्ति लहान होती ते पहिले हिंदी प्रोफेसर होते, पहिले वर्तमानपत्रकार होते, पहिले हिंदी कायदे-कौन्सिलर होते, पहिले हिंदी पार्लमेंट सभासद होते, पहिले हिंदी रॉयल कमिशनचे सभासद होते—सारांश, त्यांच्या नांवामागें 'पहिले' हें विशेषण, क्रम व गुण या उभयार्थी, संबंध आयुष्यभर लागलेलें होतें त्यांच्या चारित्रांत परिश्रमांच्या विविधतेची पराकाष्ठा पहावयास सांपडते, आणि विशेष हें कीं, 'स्वदेश' हा त्यांच्या सर्व चळवळींचा मध्यबिंदु होता अशा थोर विभूतीचें चरित्र महाराष्ट्र वाचकवृंदापुढें मांडल्यास अल्पशी देशसेवा व साहित्य-सेवा घडेल अशा हेतूनें माझा अधिकार नसतांही हें पुस्तक मीं लिहिलें आहे

मुंबई युनिव्हर्सिटीनें सन १९१८ सालीं परमानंद प्राइझसाठीं 'दादाभाई नवरोजी यांचें चरित्र व सामाजिक आणि राजकीय कार्य' हा विषय ठेवला, व त्या विषयावर निबंध मागविले हें चरित्र मूळ या बक्षिसासाठीं लिहिलें गेलें. पुढें सन १९१९ सालीं या बक्षिसाचा निकाल लागून माझ्या निबंधास बक्षीस मिळालें परंतु आश्चर्याची गोष्ट ही कीं, निबंध छापून प्रसिद्ध करण्याची परवानगी मीं युनिव्हर्सिटीपाशीं मागितली तेव्हां ती नाकारण्यांत आली युनिव्हर्सिटीची ही कृति विचित्र तर खरीच, परंतु त्यामुळें माझा तोटा न होतां फायदाच झाला. कारण, निबंध जसाच्या तसाच छापण्याचा माझा पहिला बेत मला बदलावा लागला, त्यामुळें निबंधांत अनेक नव्या गोष्टींची भर पडून चरित्राला प्रस्तुत स्वरूप प्राप्त झालें.

हें चरित्र लिहितांना खालील पुस्तकांचा मुख्यत्वेंकरून उपयोग केला आहे.

1. "Indian worthies" Edited by the Manoranjak Granth Prasarak Mandali
2. "Dadabhoy Naoroji's speeches and writings" Edited by Nateson and Co
3 "Some noted Indians of Modern times" Edited by the Christian Literary Society for India.
4. "Poverty of India" by Dadabhoy Naoroji
5. "Essays, Speeches and writings of the Hon. Dadabhoy Naoroji" Edited by C. L Parekh.
6 "Poverty and the UnBritish rule in India" by Dadabhoy Naoroji
7 "Speeches and writings of Ferojsha Metha" Edited by C Y Chintamani

दादाभाईंच्या लेखाविषयीं व भाषणाविषयीं विस्तृत ज्ञान करून घेण्याची ज्यांची उत्सुकता असेल त्यानीं वरील पुस्तकाचा जरूर अभ्यास करावा

वरील पुस्तकाशिवाय सर एच ए वाडिया, सर डी ए वाच्छा व मि० एच् एम् दादीना ( दादाभाईचे जावई ) या तीन सद्गृहस्थांकडून समक्ष भेटींत मिळालेल्या माहितीच्या आधारें प्रस्तुत चरित्राचा बराचसा भाग लिहिलेला आहे. या तिन्ही गृहस्थाचा मी फार आभारी आहें दादाभाईंच्या बडोद्यांतील कारकीर्दीची हकीगत सर्वस्वीं सर वाडिया याजकडून मिळालेली आहे ती एकांगी आहे असा संशय लो० टिळक यानीं मजपाशीं प्रगट केला, परंतु दादाभाईंच्या दिवाणगिरींविषयीं आणखी माहिती मिळवून प्रस्तुत चारित्रांत राहिलेल्या चुका दुरुस्त करण्याचें काम तावडतोब होणें शक्य नसल्यामुळे लांबणीवर टाकणें भाग आहे दादाभाईंच्या भाषणांतील किंवा लेखांतील मथितार्थ ज्या ठिकाणीं द्यावा लागला त्या ठिकाणीं वर सांगितलेल्या पुस्तकांतील इंग्रजी रिपोर्टांचें व लेखांचें शक्य तितकें मुळास धरून भाषांतर केलें आहे

**ग्रंथकर्ता.**

## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

माझ्या लहानशा पुस्तकाचा सदय जनतेकडून इतका गौरव झाला कीं, अत्यंत अल्प अवधींत त्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति काढावी लागली ही गोष्ट आनंदाची तर खरीच, परंतु त्यामुळें पहिल्या आवृत्तींतील दोष काढण्याची मला सवडच न राहून वाचकाची क्षमा मागण्याचा प्रसंग आला आहे. प्रभूच्या कृपेनें तिसरी आवृत्ति काढण्याची वेळ आल्यास पुस्तकांत बऱ्याचशा सुधारणा करण्याचा माझा निश्चय आहे.

ग्रंथकर्ता.

---

## तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

या पुस्तकाची तिसरी आवृत्ति काढण्याचा सुयोग मुख्यत. नागपूर विश्व-विद्यालयात प्रवेश परीक्षेस हें पुस्तक लागल्यामुळें आला. म्हणून नागपूर विश्व-विद्यालयाचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

ग्रंथकर्ता.

# अनुक्रमणिका

# दादाभाई नवरोजी

## प्रकरण पहिलें

## जन्म व शिक्षण

नरपतिहितकर्ता द्वेष्यतां याति लोके
जनपदहितकर्ता त्यज्यते पार्थिवेन ।
इति महति विरोधे विद्यमाने समाने
नृपतिजनपदानां दुर्लभः कार्यकर्ता ॥

पेशवाई नामशेष होऊन कंपनीची सत्ता महाराष्ट्रावर पूर्णपणें बसली होती, अंतस्थ कलहांनीं व्यापल्यामुळें मराठशाही मोडून समुद्रापलीकडील परकी, परंतु परोपकारी व न्यायप्रिय गोऱ्या लोकांचा अम्मल आपल्यावर सुरू झाला, ही गोष्ट लोकांना आतां बरी वाटूं लागली होती, पोर्तुगीज व्याह्यापासून आंदण मिळालेल्या मुंबई बेटाची चांगली सुधारणा करण्याची सुरुवात झाली होती, इंग्रजी राज्यव्यवस्था, इंग्रजी कायदे, इंग्रजी शिक्षण, इंग्रजी कल्पकता यांचें वारे हिंदुस्थानांतील इतर भागांप्रमाणेच महाराष्ट्रांत व विशेषत मुंबई बेटांत, जोरानें खेळूं लागलें होते—अशा काळीं एक पारशी कुटुंब नवसरीहून मुंबईस येऊन राहिलें. कुटुंबांत माणसें दोनच, नवरा व बायको. पुरुष—नवरोजी—दोर्डी—हे उपाध्येपणा करून चरितार्थ चालवीत, व त्यांच्या पत्नी—माणकबाई—आपल्या पतीचा गरिबीचा संसार गोड व सुखावह व्हावा म्हणून खटपट करीत. हल्लीं मुंबईच्या ज्या भागांत क्रॉफर्ड मार्केट आहे त्या भागाला त्या वेळीं बहार कोट म्हणत असत, त्या भागांत हे कुटुंब राहूं लागलें.

**जन्म**

कांहीं दिवसांनीं माणकबाई गरोदर राहिल्या. त्यांचे दिवस भरत आले तों सन १८२५च्या सप्टेंबर महिन्याची चवथी तारीख आली. दिनकर नित्यक्रमाप्रमाणेंच दशदिशा आरक्त करीत अखेर सर्व किरणें गोळा करून, मुंबईवर काळोख होणार कीं काय याबद्दल कांहीं काळजी न करता, क्षितिजाखालीं गेला. ह्याच काळोखात पुढें आपल्या-

प्रमाणेंच प्रकाशमान तारा उगवणार आहे, हें समजून रवि लवकर अस्ताला गेला असाना रविप्रकाशात इतका वेळ लोपून गेलेल्या तारकाही नित्याप्रमाणें चमकू लागल्या, नव्हे—रोजच्याप्रमाणे त्याचे तेज आज नव्हतें त्याच्या चमकण्यात कांहीं विशेष प्रकार होता कदाचित् त्या एकमेकींना कांहीं तरी हळूच सांगत असाव्या रजनीचे साम्राज्य हळूहळू वाढत जाऊन त्याबरोबर शांततेच्या निशेंत मुंबई गुग झाली हल्लींच्यासारखी त्या वेळीं रहदारी नव्हती, व त्यामुळें दोर्डींच्या घराच्या त्या भागात लवकरच सामसूम झालें नभोमंडळांतील तारका कांहींतरी आनंदाची वार्ता आपसात कुजबुजू लागल्या त्याचाच थोडासा सुगावा लागल्यामुळे कीं काय वाराही त्या कुजबुजण्याचें पाठांतर करीत त्या आनंदाच्या भरात वेड्या-सारखा भराऱ्या मारू लागला, आणि वायूच्या आनंदाचें कारण कळतांच समुद्रही हर्षानें उचंबळून आपल्या अजस्र लाटा किनाऱ्यावर धडाडा फेंकू लागला एकंदरींत त्या वेळीं सर्वच सृष्टि आनंदित झालेली दिसली ह्या आनंदाचें कारण त्या वेळीं कोणाला कळलें नाहीं, परंतु एकोणिसाव्या शतकाचा हिंदुस्थानचा इतिहास कोणीं केव्हा लिहिला, तर तें कारण नमूद केल्याशिवाय त्याला गत्यंतर नाहीं सृष्टिदेवीच्या त्या वेळच्या आनंदाचें कारण असें होतें कीं, बहार कोटातील दोर्डींच्या घरात माणकाबाईचा प्रसूतिकाल समीप आला होता, व त्या रात्रीं त्यांना ज्या पुत्ररत्नाची प्राप्ति व्हावयाची होती, तें पुत्ररत्न मोठ्या विभूतींपैकीं असून तें आपलें जीवित हिंदुस्थानच्या सेवेंत वेंचून अखिल हिंदी राष्ट्राला ललामभूत होणार होतें, ही गोष्ट सृष्टिदेवीला कळली होती

मध्यरात्रीचा सुमार झाला ११२४ पारशी सनाच्या दहाव्या महिन्यातील नेविसावी तारीख संपून दुसरा दिवस लागणार अशी संधि आली होती अशा वेळीं, जो महात्मा आपल्या उज्ज्वल चरित्रानें हिंदुस्थानाला पतित स्थितींतून उन्नत करण्यासाठीं सर्व जन्म झटणार होता, त्याची ती बालमूर्ति माणकबाई-च्या दृष्टास पडली सगळी मुंबई हळूहळू डोळे मिटून निद्रिस्त होत होती, व सगळ्या हिंदुस्थानचे डोळे अज्ञानानें व मोहानें झाकलेले होते, अशा समयीं माणकबाईच्या बाळानें आपले डोळे उघडून ऐहिक आयुष्याला सुरुवात केली पुढील आयुष्यात आपल्या देशबांधवाचे व त्याचप्रमाणें राज्यकर्त्यांचेही हिंदु-स्थानच्या खऱ्या स्थितीविषयीं डोळे उघडण्यांत ज्या पुरुषानें आपलें तनमन झिजविलें, त्याच्या चरित्राचें हें पूर्वचिन्हच म्हणावयाचें !

पुत्राचे नाव दादाभाई असें ठेवण्यात आलें पतिपत्नींनीं उभयतांच्या मतानें हें नाव ठेविलें लहानपणीं दादाभाईस दादी याच नावानें हाक मारीत दादी आपल्या बाललीलांनीं मातापितरांना दिवसेंदिवस अधिक अधिक आनंद देऊं लागला दादीचे नाक डोळे रेखीव होते बाळसें जरी बेताबाताचेंच आले होतें, तरी दादीची चिमुकली मूर्ति मनोहर दिसे व शेजारपाजारच्या स्त्रिया त्या बाळाला कडेखांद्यावर घेऊन खेळविण्यात एकमेकींशीं विशेष स्पर्धा करीत असे सांगतात काळोख्या रात्रींत शुक्राच्या चांदणीनें जसा आल्हाद होतो, तसा गरिबीच्या स्थितींत हें सुंदर बालरत्न पाहून नौरोजींना व माणकबाईला अमर्याद आनंद होत असे. त्यांच्या जीवनक्रमाच्या पूर्वीच्या शुष्कपणाला दादीच्या बोबड्या मधुर शब्दांनीं ओलेपणा येऊं लागला दादीच्या बालपणच्या क्रीडांनीं करमणूक होऊन पतिपत्नींना दारिद्र्याचा विसर पडूं लागला गरिबींत असूनही तीं पतिपत्नी स्वर्ग-सुखाच्या अमृताचें प्राशन करूं लागलीं

परंतु वस्तुमात्राची छाया जशी वस्तूला धरूनच तिच्या मागोमाग येत असते, त्याप्रमाणे सौख्यनाश सुखाच्या मागोमाग, त्याला जणु काय मिठी मारून, धावत असतो दादी चार वर्षांचा झाला असेल नसेल, तोंच स्वर्गसुखाचा प्याला माणकबाईच्या ओष्ठापासून खालीं पडून फुटला दुष्ट काळानें नवरोजींस या जगांतून ओढून नेलें व त्यामुळे माणकबाईवर दुःखाचा डोंगर कोसळला अगो-दरच गरिबी, व त्यांतही त्यांना ज्याचा सर्वस्वी आधार तोच पुरुष नाहींसा झाला त्यामुळे या अफाट जगांत त्या माउलीला अगदीं उघडे पडल्यासारखे झालें त्यांच्या दीन अंतःकरणाला काय यातना झाल्या असतील याची कल्पना होणें दुरापास्त आहे अशा विपन्नतेंत आपल्या बालकाचें संगोपन करण्याची जबाबदारी त्यांना फार वाटूं लागली एकंदर परिस्थितीमुळें माणकबाईचे मन अत्यंत उद्विग्न झालें आप्तेष्टांनीं व शेजाऱ्यापाजाऱ्यांनीं जनरूढीप्रमाणें त्यांना धीराचे चार शब्द सांगून दुःखाचें सांत्वन करण्याचा यत्न केला शोकाची विफलता ओळखून माणकबाईनीं आपल्या दुःखावेगाचें संयमन केलें शक्य तितकी मदत करण्याचें त्यांच्या भावानें कबूल केल्यामुळें त्यांना थोडासा धीर आला आणि 'आलिया भोगासी' सादर होऊन आपल्या बालकाच्या मुखाकडे पाहून माणकबाई जगरहाटीचे दिवस काढूं लागल्या.

दादीला पांच वर्षे पुरी होताच त्याच्या विवाहाची कल्पना माणकबाईंनी काढली. त्यांनीं आपल्या भावाचा या बाबतींत सल्ला घेतला

**विवाह**

आणि एक वर्षाची मुलगी पाहून तिच्याशी दादीचें लग्न उरकून घेतलें. इतक्या लहानपणीं दादाभाईचें लग्न झालें होतें, हे कोणाला खरेंसुद्धा वाटणार नाही. परंतु, समाजसुधारणेच्या व स्त्रीस्वातंत्र्याच्या कार्यासाठीं ज्या पुरुषानें आपले ऐन उमेदीचे पुष्कळ दिवस खर्च केले, त्या पुरुषाचें—हिंदुस्थानांतील सामाजिक व त्याप्रमाणेंच राजकीय सुधारणेच्या, व चळवळीच्या जनकाचें लग्न पांचव्या वर्षी झाले होतें, हे अविश्वसनीय असलें तरी खरें आहे. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभाला पारशी लोकांत हिंदु लोकांप्रमाणेंच बालविवाहाची चाल फार प्रचलित होती. आज मुंबईस सायंकाळी चौपाटीवर फिरावयास गेले, तर वीसपंचवीस वर्षांवरही अविवाहित राहिलेले, रंगीबेरंगी पोशाख केलेले पारशी समाजांतील कन्यापुत्र आनंदानें फिरत असतांना 'खोड्या च्या फूटपाथवर' दृष्टीस पडतात. परंतु दादाभाईंच्या जन्माच्या सुमारास ही स्थिति नव्हती. त्या वेळचा पारशी समाज बालविवाहाचा पुरस्कर्ता, त्यांतही दादाभाईचे वडील पुरोहितपणा करणारे, भिक्षुकी पेशाचे आणि अशिक्षित स्त्रीवर्गाच्या स्वाभाविक मानसिक स्थितीप्रमाणें विचार करणारी माणकबाई, तेव्हां कुटुंबाचें पोषण करणारा पुरुष घरांत नाहीं, म्हणून आपल्या हातानें ह्या एकुलत्या एका पुत्राचें लग्न तरी करून टाकूं दे, अशी माणकबाइस घाई झाली असावी. काहीं असलें तरी पांचव्या वर्षी दादाभाई अगर छोटा दादी विवाहबद्ध होऊन बसला एवढे खरें.

सुनेचे नांव गुलबाई असें होतें. गुलबाईच्या अंगीं सुस्वरूपत्व नव्हतें, इतकेंच नव्हे, तर त्या कुरूप होत्या असें म्हटलें तरी चालेल. त्यांनी आपल्या प्रेमळ स्वभावानें या अवगुणाला पुष्कळसें लोपविलें होतें हे खरें, परंतु त्यांच्या ठिकाणीं बुद्धिमत्ताही काहीं विशेष नव्हती. अशा स्त्रीशीं जन्माची गांठ पडल्यामुळें दादाभाईंच्या संसारसुखांत थोडाबहुत तरी उणेपणा आल्याशिवाय राहिला नसेल, आणि सुंदर व चतुर स्त्रीचें साहाय्य दादाभाईस असतें तर त्यांच्या हातून झालें यापेक्षांही अधिक कार्य पार पडलें असतें, असें वारंवार मनांत येतें. सुशिक्षित व बुद्धिवान् पत्नीच्या सहवासानें त्यांचे काहीं श्रम वांचले असते, त्यांचा उल्हास व उत्साह वाढला असता, पूर्ण गृहसौख्य मिळाल्यामुळें ते अधिक दिवस जगले असते, एक ना दोन, काय झालें असतें किंवा काय झाले नसतें, ते

काय सागावें ? जे झाले ते विधिघटनेच्या निष्ठुरतेचे एक उदाहरण होय, असे म्हटल्यावाचून राहवत नाही

ज्याचा बाप किंवा विशेषत ज्याची मातोश्री, लहानपणीच इहलोक सोडून गेली असेल, ती मुले प्रेमासाठीं भुकेलेली असतात लहानगा दादी आपल्या आईचा फार लाडका होता, व ती त्याला प्राणापलीकडेहा

**काव्यकल्पना**

जपत असे हें खरे, तरी शेजारची मुले आपल्या बापाला लडिवाळपणे हाक मारतात तशी हाक मारण्यास आपल्याला कोणी नाहीं, असे पाहून दादीचें मन व्यथित होई सृष्टीतील कोणत्याही पदार्थाकडे पाहिले, रविचंद्र इत्यादिकाकडे दृष्टि दिली, कीं आपण पितृहीन आहों हा जाणीव दादीच्या मनात वरचेवर जागृत होई टी पा ओकानॉरच्या मार्मिकान दादाभाईनीं आपले अल्पसे चरित्र मोठेपणीं लिहिलेलें आहे, त्यात ते या जाणिवे-बद्दल म्हणतात कीं, " मी लहान असताना एक विचित्र कल्पना माझ्या मनात अगदी पक्की बिबून गेली होती, आणि अजूनही मला तिचा विसर पडला नाहीं मला नेहमीं असे वाटे कीं, माझे वडील माझ्या लहानपणीच मला सोडून परलोकी गेले म्हणून मला माझे आप्तइष्ट ज्याप्रमाणे प्रेमानें वागवितात त्याचप्रमाणे आकाशातील चंद्रसुद्धा माझ्याशी मोठ्या प्रेमळपणाने वागतो त्याला माझी केवढी काळजी पहा ! मी घराच्या पुढच्या अंगणात असो का, मागच्या गल्लीत जावो, तो आपला सर्वदा माझ्याबरोबरच आहे ! त्याचें हे निर्व्याज प्रेम पाहून माझ्या मनाला फार बरे वाटे, आणि अजूनही कोणी माझ्याशी प्रेमाने वागले, कीं मला फार समाधान होते "

लहानग्या दादीची हा चंद्रविषयक कल्पना जितकी करुण तितकीच काव्यमय आहे पितृहीन दादीचे अंतःकरण चंद्रबिंबानें आकर्षित व्हावे, हे जरी साहजिकच असलें, तरी ती कल्पना दादीच्या काव्यपूर्ण हृदयाची साक्ष पटविते, हें खास " A hero is a hero at all points " ( थोराचे सर्वच थोर ) या कार्लाइलच्या उक्तीची अधुकशी साक्ष दादीच्या कल्पनेने पटण्यासारखी असून पुढें अप्रतिम समाजसेवक व राजकीय योद्धा म्हणून नावाजलेले दादाभाई निराळ्या परिस्थितींत असते तर कदाचित् अलौकिक कवि झाले असते कीं काय, असा अस्पष्ट विचार मनांत येऊन तसाच घुटमळत राहतो

माणकबाई शाळेंत जाऊन पुस्तकें वाचण्यास शिकल्या नव्हत्या, तथापि त्यांच्या अंगीं धोरण, शहाणपण व गभीरपणा, हे गुण उत्कटतेनें वास करीत होते. दादीच्या मनाला उत्तम वळण लावण्याची त्यांनीं अतिशय खबरदारी घेतली राजकीय चळवळींत वेळो वेळीं दादाभाईंनी जें शहाणपण योजिलें, आणि संकटाच्या प्रसगीं शत्रूसही थक्क करून सोडणारें जें गांभीर्य आणि धैर्य दादाभाईंनीं दाखविलें तीं माणकबाईच्या स्वाभाविक गुणाचीं दादीच्या स्वभावांत उतरलेलीं व उत्कर्ष पावलेलीं स्वच्छ प्रतिबिंबें होत या सहज गुणबीजाची दादाभाईच्या अंतःकरणांत वाढ व्हावयास शिक्षणासारखें पोषक द्रव्य अत्यवश्य आहे, हे माणकबाईंना समजले हें त्यांचें केवढें चातुर्य आहे ! दादीला शाळेंत घालावयाचें मातेनें मनांत आणलें. बहारकोटांतच एका मेथाजीनें शाळा घातली होती "तात्या पतोजी"-च्या मराठी शाळा आपल्याकडे माहीत आहेत, तसलीच ती शाळा होती 'छडी लागे चमचम, विद्या येई घमघम' असल्या पद्धतीनें मुलांस विद्या पढविणाऱ्या मेथाजीच्या शाळेंत दादीवर सरस्वतीचा प्रथम अनुग्रह झाला दादीला पाटी-दप्तराची तयारी माणकबाई मोठ्या प्रेमानें कशी करून देत असतील ती धूळपाटी आपल्या चिमकुल्या हातात घेऊन दादी शाळेला निघाला म्हणजे त्या मातेच्या मनात सद्यःकालीन आनंद, भविष्यकाळची काळजी पतिनिधना-विषयींचा शोक, हे परस्परविरुद्ध विकार कसे उभे रहात असतील, मेथाजीच्या तोंडाकडे आपल्या पाणीदार व कुतूहलपूर्ण डोळ्यांनीं दादी कसा पहात असेल, आणि त्या चुणचुणीत बालकाकडे पाहून मेथाजीच्या मनांत काय विचार येत असतील, याचें चित्र रंगवून डोळ्यांपुढें आणण्याचा प्रयत्न केला कीं, मनाला विशेष आनंद होतो.

**शिक्षणाचा ओनामा**

मोठेपणीं अचाट कामगिरी करून ज्यांनीं जगाला दिपवून टाकलें, अशा थोर पुरुषांचें बालपण दांडगाईंत, खोडकरपणांत, व हट्टात गेलेलें दिसतें रवींद्रनाथ टागोर आठ वर्षांचे होईपर्यंत शाळेंत गेले नाहींत, एवढेंच नव्हे, तर शाळा-गृहाच्या चार भिंतींत कोंडून टाकलेल्या विद्येची त्यांना कुबट घाण येत असे. शाळेंत जाऊन बसण्याचा वनवास चुकावा म्हणून अनेक वेळां छोटा रवींद्र आपले बूट पाण्यांत भिजवून घेऊन अंगांत सणसणून ताप भरण्याची व्यवस्था करीत असे मोठेपणीं लोकोत्तर कार्य करून दाखविणारे व लहानपणीं हूड

असल्या लोकांच्या वर्गांत दादाभाई जाण्यासारखे नव्हते. दादींची विद्याभिरुचि लहानपणापासूनच वाखाणण्यासारखी होती दादींचें विद्याप्रेम आणि कुशाग्रबुद्धि पाहून मेथाजी तर त्यावर अत्यंत खूष असत त्याला ते आपल्या मुलाप्रमाणें समजत व प्रेमानें वागवीत.

मेथाजीच्या या प्रेमामुळेंच दादींचें शिक्षण बहारकोटातील प्राथमिक शिक्षणाच्या शाळेंत परिसमाप्त झालें नाही नाहीतर दादीला शिक्षण देण्याची माणकबाईच्या मनातली हौस फारशी पुढें गेली असती असें वाटत नाही त्या वेळीं Native Education Societyची एक इंग्रजी शाळा होती, परंतु या शाळेंत दादीला पाठविण्याविषयीं माणकबाईचें मन विशेष उत्सुक नव्हतें. ती इंग्रजी शाळा, इंग्रज लोकांनीं चालविलेली, तेव्हां त्या शाळेंत आपलीं मुलें पाठविलीं तर तें त्यांस बाटवितील, बाटविलें नाहीं तर निदान त्यांच्या शिक्षणाचा मुलाच्या मनावर जो एकदर परिणाम होईल तो थोडाबहुत अनिष्टच होईल असे ग्रह त्या वेळच्या मुलांच्या पालकांच्या मनांत बरेच दृढ होते. आणि ते माणकबाईच्याही मनांत असणें साहजिक होतें

**इंग्रजी शाळा**

आपल्याला अगोदर पैसा दुर्मिळ झाला आहे, तेव्हां दादींचें पाऊल इंग्रजी शाळेंत पडणें म्हणजे आपला पैसाही घराबहेर पडणे होय अशी भीति माणकबाईस वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें, आणि म्हणूनच दादीस इंग्रजी शाळेंत जाऊं देण्याविषयीं त्यांचा रुकार मिळविण्यास मेथाजीला फारसें अवघड गेले नसेल. कारण, हल्लीं जसें इंग्रजी शिक्षण महाग झालें आहे तसें तें त्या वेळीं नव्हतें. आजच्याप्रमाणें पैसा पुरविणें त्या वेळीं भाग असतें तर दरिद्री माणकबाईनीं स्वच्छ सांगितलें असतें कीं, दादीस या इंग्रजी शाळेंत घालण्यापेक्षां त्याच्या पोटांत दोन वेळ घांसभर अन्न घालणें मला अधिक श्रेयस्कर वाटतें; दादीला इंग्रजी आलें नाहीं तर त्याला मी काय करूं? आमच्यासारख्या दरिद्री आईबापांच्या पोटीं दादीचा जन्म झाला हें त्याचें दुर्दैव असें म्हणून स्वस्थ बसणें भाग आहे. परंतु दादीच्या सुदैवानें म्हणा किंवा ज्या हिंदुस्थानची सेवा दादीच्या हातून व्हावयाची होती त्या भरतभूमीच्या थोर भाग्यानें म्हणा, ह्या शाळेंत इंग्रजी शिक्षण मोफत देत असत इतकेंच नव्हे, तर इंग्रजी शिकावयास येणाऱ्या

**मोफत शिक्षण**

विद्यार्थ्याना चांगल्या शिष्यवृत्तीही मिळत आपल्या मातेच्या दारिद्याची आड काठी न येता आपल्याला इंग्रजी शिक्षण मिळालें तें हवा मोफत शिक्षणाच्या सौयीमुळें आणि त्यायोगानेंच आपल्या हातून थोडीफार देशसेवा झाली, ही गोष्ट दादाभाईच्या स्मरणातून कधींही गेली नाहीं आपल्या सत्कीर्तीचा उगम आपल्याला फुकट मिळालेल्या इंग्रजी शिक्षणात आहे, लहानपणीं फुकट संपादन केलेल्या विद्येंत आपल्या महत्कार्याचें बीज आहे, ह्याची त्याना नेहमीं जाणीव असे त्यांची अशी खात्री झाली होती—व ते वेळोवेळीं बोलूनही दाखवीत–कीं, ज्या देशाची उन्नति व्हावयास पाहिजे असेल, त्या देशातील शिक्षण मोफत व सार्वत्रिक प्रथम झालें पाहिजे ऐषआरामाचा उपभोग घेणाऱ्या घराण्यापेक्षा मीठ–मिरचीवर कसाबसा उदरनिर्वाह करणाऱ्या कुटुंबातच कुशाग्र बुद्धीचीं माणसें निपजतात, तेव्हा शिक्षण महाग करणें म्हणजे असल्या माणसांचे मेंदू चिरडण्याचें यंत्रच तयार करणें होय, जोंपर्यंत हिंदुस्थानांतील शिक्षण मोफत झालें नाहीं, तोंपर्यंत ह्या देशाच्या सुधारणेची प्रगति गोगलगाईच्या मंद गतीनेंच होत रहाणार, विद्येची बाब लोकाना खर्चाची होऊन उपयोगी नाही, विद्या लोकाच्या घरोघर पोहोंचविणें हें आमच्या पुढाऱ्याचे पहिलें कर्तव्य आहे–वगैरे विचार दादाभाई वारंवार प्रगट करीत.

नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या इंग्रजी शाळेंत दादीचा प्रवेश झाला, त्या वेळीं त्या शाळेंत दोन युरोपियन शिक्षक होते शाळा चालविण्याच्या कामात त्या दोघांचें पटेना कारण, एक होता शिस्तीचा कट्टा भोक्ता व दुसरा पडला पुरा ढिल्या स्वभावाचा दोघांच्या मतानें शाळेचें काम चालणें अधिकाधिक कठीण होऊ लागलें शेवटीं त्या शाळेचे दोन भाग करण्यात येऊन दोघानीं एकेक भाग घेऊन आपल्या मर्जीस येईल तसा तो चालवावा असें ठरलें नबाबी साहेबाच्या भागात दादी होता हे साहेब अभ्यासासाठीं पोराना कधींही त्रास देत नसत, धडा चुकल्याबद्दल शिक्षा करणें तर त्यांना ठाऊकच नव्हतें, मुलाना कडक शिस्तीनें वागविण्याची दक्षता ठेवण्याची त्याना जरूरच वाटली नाहीं. त्याचा परिणाम साहजिकच असा झाला कीं, या साहेबाच्या हाताखालचीं मुलें शाळेंत धुडगूस घालण्यापलीकडे काहीं करीत नसत दादीही त्या मुलाबरोबर खेळण्यांत पटाईत झाला. जिलीदाण्डूच्या डावांत–आपण ज्याला विटीदांडू म्हणतों त्यांत–तर दादीचा हात धरणारा कोणीच नव्हता परंतु दादी कितीही खेळला तरी

त्यानें उनाडपणा कधींही केला नाहीं शाळेंतील धडे तर नियमितपणानें तो करीतच असे, पण शिवाय साहेबाच्या ढिलाईमुळें मिळणाऱ्या रिकामपणाचाही त्यानें सुंदर उपयोग करून घेतला शाळेंत फुरसत मिळाली, कीं दादीनें आपल्या भोंवतीं सगळे बालगोपाळ जमवावे आणि त्याना अशा सुरस व चमत्कारिक गोष्टी सांगण्यास सुरुवात करावी कीं, त्या ऐकताना दादीच्या बालमित्रानीं देह-भान विसरून जावें ह्याप्रमाणे रोजच्या क्रमानें दादीची कथाकथनशक्ति इतकी वाढली कीं, शाळेंतील सगळ्या मुलांचा तो अगदीं दोस्त बनला, व तीं त्याला 'दादी' म्हणून मोठ्या प्रेमानें संबोधू लागलीं आपण जाऊं तिकडे सदासर्वदा दृग्गोचर होणाऱ्या चंद्राविषयीं आत्मप्रेम बाळगणाऱ्या लहानग्या दादीच्या कल्पने-च्या भरारीची या ठिकाणीं पुन्हा ओळख पटते

याच सुमारास एक विशेष लक्षात ठेवण्यासारखा प्रसंग घडून आला इतर पार्शी कुटुंबाप्रमाणें दादीच्या घरातही रोज रात्रीं जेवणानंतर थोडासा बेवडा पिण्याची वहिवाट होती. एके दिवशीं घरात बेवडा शिल्लक नसल्यामुळें दादी व

**दोन महत्त्वाचे प्रसंग**

बमन नावाचा त्याच्या नात्याचा एक समवयस्क मुलगा, असे दोघे शेजारच्या बेवड्याच्या दुकानात गेले दुकानातील एकंदर गलिच्छपणा, बेवडा पिऊन उन्मत्त झालेल्या लोकांचे किसळवाणे प्रलाप, तेथील लोकांचें वर्तन, झिंगून खालीं पडलेल्या माणसाची केंविलवाणी स्थिति, गरीब, अज्ञानी व व्यसनी गिऱ्हाइ-कांच्या हीन स्थितीचा फायदा घेऊन आपला खिसा गरम करणाऱ्या दुकान-दाराचा अमानुषपणा—वगैरे प्रकारानीं दादीचें मस्तक अगदीं भणाणून गेलें त्याच्या सुसंस्कृत मनाला एकदम धक्का बसला, त्याच्या सर्वांगावर शहारे उभे राहिले, आणि आजपासून बेवड्याच्या थेंबालाही आपण कधीं स्पर्श करणार नाहीं अशी दादीनें लगेच शपथ घेतली, आणि तेथून उठून तो आपल्या घरीं निघून आला

आणखी एका प्रसंगीं दादीनें असेच निश्चयाचें वर्तन केलें एके दिवशीं संध्या-काळीं शाळा सुटल्यानंतर तेथेंच मुलें खेळात गुंतलीं संध्याकाळची ती शांत वेळ असून अस्ताला जाणाऱ्या रवीचीं आरक्त किरणे क्रीडांगणावर पसरलीं होतीं दादी खेळांत सामील झाला नाहीं. तो शाळेच्या दगडी पायऱ्यांवर बसून कांहीं विचारांत गुंतला होता मुलाच्या खेळाकडे त्याची दृष्टि होती, पण लक्ष कांहीं

तिकडे नव्हतें. इतक्यांत एकाएकीं खेळांत कांहीं भांडण उपस्थित होऊन एका मुलानें दुसऱ्याला शिव्या दिल्या त्यानेंही तसेंच उलट शेलापागोटें परत केलें मुलांचं हें असभ्य वर्तन पाहून व त्यांचे ते किळसवाणे अपशब्द ऐकून दादीला फार वाइट वाटलें तो मनाशीं विचार करू लागला, असलाच उनाडपणा व शिवीगाळी करण्यात माझें आयुष्य जाणार काय? माझी माता माझ्यावर प्राणा पेक्षा पलीकडे प्रेम करिते व मला सुख व्हावे म्हणून रात्रंदिवस झटते, त्या तिच्या प्रेमाचा व श्रमाचा मोबदला मी असल्याच खेळाडूपणानें व जिव्हेच्या दुरुपयोगाने देणार काय? हेंच का आपलें कर्तव्य, हेंच का मातृप्रेम, हीच का आपली मातृनिष्ठा? हेंच का आपल्या जीविताचें सार्थक? यांसारखे विचार दादीच्या मनात आवेगाने उभे राहिले तो वर पाहतो तों क्षितिजाखालीं जाणारें उद्विग्न रविबिंब त्याच्या दृष्टीस पडलें व त्यामुळें त्याच्या विचारांची फारच खळबळ उडाली त्याचें मन गंभीर झाले त्याने तत्काल निश्चय केला कीं, यापुढें तोंडांतून अपशब्द म्हणून कधींही निघू द्यावयाचा नाहीं पुढील सहा सात तपांच्या अवधींत दादाभाईचा हा निश्चय क्षणभरही टळला नाहीं एखाद्या गोष्टीचा किंवा व्यक्तीचा दादाभाईंना अत्यंत संताप आला असतांही "आग लागो त्याला" "Confound it" यापेक्षा तीव्र उद्गार त्यांच्या तोंडून कधीं निघाले नाहींत एखाद्याच्या तोंडून अपशब्द आला व त्याला तसली खोड आहे असें दिसलें, तर त्यानें ती खोड टाकून द्यावी म्हणून दादाभाई त्यास मोठ्या कळकळीनें उपदेश करीत.

वर्गांत दादीचा नंबर सदाच पहिला ठेवलेला. प्रत्येक विषयांत तो मोठ्या उत्साहानें मन घाली निव्वळ पाठांतराच्या जोरावर अभ्यास करून विषय लक्षांत ठेवावयाचें त्यानें कधींच मनांत आणिलें नाहीं. त्या त्या विषयांतील बारीकसारीक गोष्टी पूर्णपणें समजून घेऊन मनात विषय पक्का बिंबविण्याचा दादीचा प्रयत्न असे व त्यामुळें एकदां शिकलेली गोष्ट त्याच्या लक्षांतून ओघळून पडली असें कधींच घडलें नाहीं. एका महिन्याला असें झाले कीं, परीक्षेच्या वेळीं एका मुलानें सगळीं गणितपत्रकें पाठ करून येऊन दादीपेक्षां अधिक मार्क मिळविले, व पहिल्या नंबरचें बक्षिस पटकाविलें परंतु बक्षिससमारंभाच्या वेळीं हें बाहेर पडलें, आणि दादीच्या बुद्धिचातुर्याची श्रेष्ठता पूर्णपणें सिद्ध झाली त्या वार्षिक समारंभाच्या प्रसंगीं परीक्षकांनीं कांहीं प्रश्न त्या मुलास विचारले, तेव्हां त्याची

अगदीं गाळण उडाली, परतु दादीनें चटकन् पुढें होऊन भराभर सर्व उत्तरें बरोबर दिलीं त्या वामनमूर्तीची ही थोर कृति पाहून समारभास आलेल्या एका गृहस्थानें दादीस बक्षीस दिलें या समारंभास हजर असलेल्या मिसेस पोस्टन नावाच्या एका इंग्रज विदुषीनें 'western India' 'पश्चिम हिंदुस्थान' या नावाच्या पुस्तकात या बालवीराचें त्या समारंभाच्या वेळचें वर्णन दिले आहे ती लिहिते कीं, 'या मुलाचा भालप्रदेश विशाल होता, आणि त्याच्या नेत्रात तर एक प्रकारचें जादूसारखें मोहक पाणी भरलें होतें वर्गातील मुलास प्रश्न विचारल्या-बरोबर सर्वांच्या आधीं हा मुलगा पुढें होई, त्याच्या त्या विचारपूर्ण वृत्तीबरोबर भुवया आकुंचित होत, ओंठांचें चलन होऊन ते एकमेकापासून दूर होत आणि उत्सुकतेच्या भराने प्रश्न विचारणाऱ्यापुढें एक बोट करून तो मुलगा मनांतल्या मनांत प्रश्न सोडवून मोठ्या कौतुकास्पद त्वरेने उत्तर देऊन टाकी सर्व मुलांच्या अगोदर आपण उत्तर द्यावें, आपण सर्वांच्यावर ताण करावी अशी तीव्र इच्छा त्याच्या मनांत आहे हें उघड दिसे, आणि त्याची इच्छा सफल होण्यापुरतें विलक्षण बुद्धिसामर्थ्यही त्याच्या ठिकाणीं दिसलें'

या नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीचें कॉलेजही होतें शाळेंतील शिक्षण सप-विल्यावर दादाभाईंचा याच कॉलेजांत प्रवेश झाला

**उच्च शिक्षण**

कॉलेजांतील उच्च शिक्षणाच्या मंद शीतल वायूच्या झुळकेनें दादाभाईच्या विद्याव्यासंगाची कलिका प्रफुल्ल होऊ लागली परीक्षेस नेमलेल्या पुस्तकांशिवाय इतर ग्रंथांचें अध्ययन करावें. बुद्धीस तेज देणारे विषय अभ्यासावे, शीलाला चांगले वळण देणाऱ्या ग्रंथकारांच्या उक्तींचें मनन करावें, सुविचार संग्रहावे, मानसिक शक्तीची वाढ करावी, असले हेतु दादाभाईच्या हृदयांत उत्पन्न झाले या दृष्टीनें " फिरदोसीचा शाहनामा " त्यानें प्रेमानें व लक्षपूर्वक वाचला त्यानंतर " झोरा-स्टरच्या भक्ताचीं कर्तव्यें " या पुस्तकाचें त्यानें अंतःकरणपूर्वक पारायण केलें व त्यांतील उपदेशाचा त्याच्या आचरणावर फार चांगला परिणाम झाला. 'पवित्र विचार, पवित्र उच्चार व पवित्र आचार' हें या पुस्तकांतील सारभूत तत्त्व आहे. या पुस्तकापेक्षांही दादाभाईस प्रिय झालेलें पुस्तक म्हणजे (Wyatt) व्याटनें केलेलें " मानसशिक्षा " " Improvement of the mind " हें होय. हें पुस्तक वाचल्यापासून दादाभाईनें ठरविलें कीं, मितभाषण हें मनुष्याचे

पहिलें कर्तव्य होय जेथें एका शब्दानें कार्य होण्यासारखें असेल तेथें दोन शब्द खर्च करणें म्हणजे वाचेचा आपण होऊन अपव्यय करून घेण्यासारखें आहे. शुद्ध विचार व निर्मल वाचा ही जीवनसामर्थ्याची गुरुकिल्ली होय

वाचनव्यासंगाच्या वाढीबरोबर दादाभाईंचे विचार प्रगल्भ आणि अंतर्मुख होऊ लागले पुढील आयुष्यक्रमाच्या रूपरेखेच्या आखणीचा विचार त्यांच्या मनांत डोकावू लागला आपलें जीवन केवळ आपल्या एका व्यक्तीपुरतें नसून त्यावर अनेक इसमांचा, समाजाचा व राष्ट्राचा हक्क आहे असें दादाभाईंच्या मनात वारवार येऊ लागलें या जगात जन्म पावल्यानंतर देवऋण, पितृऋण वगैरे ऋणें फेडणें प्रत्येक जीवाला अवश्य आहे, या हिंदुधर्माच्या तत्त्वाप्रमाणेंच त्याला जीवाचें कर्तव्य दिवसानुदिवस अधिक अधिक पटूं लागलें आपल्याला जन्म देणाऱ्या व स्वार्थाकडे पूर्ण दुर्लक्ष करून आपल्यासाठीं कष्ट करणाऱ्या मातेला सुख देणें हें आपलें कर्तव्य आहेच, पण याशिवाय ज्यांनीं आपल्यासारख्यांना मोफत शिक्षण मिळण्याची व्यवस्था करून ठेविली, ज्यांच्या परोपकारबुद्धीमुळें आपल्याला आपली उन्नति करून घेण्याचा मार्ग सहज खुला झाला, त्या सर्वांच्या उपकाराची फेड आपणास करावयास नको काय? आपल्या समाजाचे आपण ऋणि असून त्याचे उपकार आपण सदैव स्मरणांत ठेविले पाहिजेत, आपल्या देशबांधवाचें एक प्रकारचें ओझें आपल्या शिरावर असून तें ओझें कमी करावयाचे असल्यास आपली काया देशसेवेंत झिजविणें याच्याइतकें प्रमुख व पवित्र कर्तव्य दुसरें नाहीं, असे विचार मनात येऊन त्यांतच दादाभाईंचे तासचे तास जाऊ लागले याच सुमारास क्लार्कसनचें "गुलामाचा व्यापार" Clarkson's "The Slave Trade" हें पुस्तक दादाभाईंच्या हातीं आलें गरीब लोकाची हलाखी, मनुष्यप्राण्याची नैसर्गिक समता, सत्तेनें बलिष्ठ असलेल्या लोकांच्या हातून घडणारें पाप, अनाथांचा पक्ष घेण्यांत मिळणारें अप्रत्यक्ष पुण्य व सामर्थ्य, परोपकाराची महती व आवश्यकता, इत्यादि विचारांनीं हें पुस्तक खचून भरलेले आहे त्यांतील विचारांशीं दादाभाईंच्या मनांतील हेतूचा सूर मिळाला, व आपल्या मनांत जे विचार एकसारखे घोळत आहेत ते कल्याणकारक आहेत, ते सर्वस्वी इष्ट आहेत, असा भरंवसा दादाभाईंस वाटूं लागला. शेवटीं हावर्ड साहेबाचें चरित्र वाचल्यावर तर लोकसेवेच्या विचारांनीं दादाभाईंच्या अंतःकरणास आपलें चिरंधाम करून टाकलें. ईश्वरानें

आपणांस मनुष्यजन्म दिला तो किड्यामुंग्यांप्रमाणें किंवा इतर प्राण्यासारखा खाण्यापिण्याची धडपड करीत फटकन् मरून जाण्यासाठीं नव्हे, तर दीर्घोद्योगानें व स्वार्थरहित दृष्टीनें आपली स्वतःची, समाजाची व राष्ट्राची उन्नति करण्यासाठीं होय, संपत्तीच्या मोहावर लाथ मारून आणि संकटांच्या बुजगावणीवर पाय देऊन आपण पुढें पाऊल टाकावें आणि समाजाला व राष्ट्राला पुढें न्यावें हेंच आपल्या आयुष्यातील कर्तव्य आहे, असें दादाभाईच्या मनावर आतां पूर्णपणें बिंबलें याबद्दल त्याला कसलीही शंका उरली नाहीं आणि 'निश्चयाच्या बळाची' त्याच्या ठिकाणीं जागृति झाली त्याचा 'जीवन संदेश' त्याला समजला आणि लोकसेवेच्या अढळ ध्रुवताऱ्याकडे दृष्टि लावून आपला कर्तव्यमार्ग आक्रमण करण्यास त्यानें सुरुवात केली

दादाभाई कॉलेजांत शिकत असता त्याचे प्रोफेसर त्याच्या बुद्धिसामर्थ्याची व अध्ययनप्रेमाची फार तारीफ करीत त्याच्यावर सर्वांची मर्जी असे व गणित विषयाचे अध्यापक तर त्याला जीव कीं प्राण करीत सन १८४५ मध्यें दादाभाईचें कॉलेजातील शिक्षण संपत आलें होतें त्या वेळीं बोर्ड आफ् डायरेक्टर्सचे अध्यक्ष अर्स्किन पेरी हे होते. दादाभाई हा एक अतिशय हुशार व गुणशीलवान् मुलगा आहे हें त्याना माहीत होतें व त्याच्याविषयीं पेरीसाहेबांना कळकळ वाटत होती कॉलेजातून सुटल्यावर दादाभाईनें एखाद्या ठिकाणीं नोकरीच्या डबक्यात आपल्या बुद्धिवैभवाला कुजत टाकावें ही गोष्ट पेरीसाहेबांना कशीशीच वाटे, त्याच्यासाठीं कांहींतरी करावें असें त्यांनीं मनात आणिलें, व विचार करून त्यांनीं एक योजना काढली बॅरिस्टरीच्या अभ्यासासाठीं दादाभाईनें विलायतेस जावें व त्याचा निम्मा खर्च दादाभाईचें कौतुक करणारे पहिले सर जमशेटजी, क्रामा, भाऊ दाजी, करसेटजी नसरवानजी वगैरे लोकांनीं द्यावा व बाकीचा अर्धा पेरीसाहेबांनीं स्वतः सोसावा अशी सूचना त्यांनीं वरील मंडळीं-पुढें मांडली या योगानें एका गरीब पार्शी मुलाचें जन्माचें कल्याण होईल असें पाहून सर जमशेटजींस ती सूचना पसंत पडली आपण अर्धा खर्च देऊं असें ते इतरांना म्हणूंही लागले परंतु, विलायतेस जाऊन राहून आलेल्या पार्शी तरुणांपैकीं कांहींनीं धर्मत्याग करून ख्रिस्तीधर्म स्वीकारला होता. व बाकीच्यांनीं स्वधर्म जरी उघडपणें सोडला नव्हता तरी अभक्ष्यभक्षण व मदिरापान यांची संवय लावून घेऊन आपल्या द्रव्याचा व शक्तीचा ऱ्हास करून घेतला होता,

आणि धर्मसंस्कृति व नीति यांजवर सर्वस्वी पाणी सोडून आपलें हसें करून घेतलें होतें या तरुणांच्या उदाहरणावरून तरुण मंडळीला परदेशी पाठविणें फार धोक्याचे आहे असें लोकास वाटू लागले, आणि दादाभाईला विलायतेस पाठविण्याची गोष्ट निघताच हीच भीति पुष्कळ मंडळींच्या डोळ्यांसमोर दिसूं लागली पैसा खर्च करण्याची आपली तयारी आहे असें सर जमशेटजींनीं जरी प्रथम बोलून दाखविलें होतें तरी त्यांना ही गोष्ट अनिष्ट वाटूं लागली व दादाभाईला विलायतेस धाडण्यास आम्ही तयार नाहीं, असें त्यानीं पेरीसाहेबांस शेवटीं कळविलें आपली योजना सिद्धीस जात नाहीं हें पाहून पेरीसाहेब हिरमुष्टी झाले परंतु धर्मबाबतींत सर जमशेटजींची समजूत घालणें शक्य नाहीं, जसें पाहून त्यांनीं आपला नाद सोडून दिला, त्यामुळें दादाभाईचें त्या वेळीं इंग्लंडला जाणें तसेंच राहिले

कॉलेजांतील अभ्यास संपला तेव्हा दादाभाईच्या मातेस किती आनंद झाला असेल याची कल्पना त्या स्थितीचा अनुभव असलेल्या मातांच्याशिवाय इतराना येणें शक्य नाहीं नवऱ्याच्या पाठीमागें मुलाची जी आपण जोपासना केली तिचें आज चीज झालें, असें त्याना मनापासून वाटलें असेल, आणि परमेश्वराचे हे आपल्यावर मोठे उपकार आहेत असें मनात येऊन त्यांचें अंतःकरण सद्गदित झालें असेल आता कोठें तरी दादाभाईनें चांगलीशी नोकरी धरून सुखानें संसार करावा अशी माणकबाईची आशा असणें साहाजिक होतें दादाभाईनाही दुसरी कोणची गोष्ट शक्य दिसेना, त्यामुळें नोकरी करण्याकडे त्यांचेंही मन वळलें नोकरी मिळणें, व ती दादाभाईसारख्या हुशार विद्यार्थ्यास, त्या काळीं अवघड नव्हतें हा गरीब विद्यार्थी फार बुद्धिवान् व सद्वर्तनी आहे असें पुष्कळ मोठ्या लोकांना माहीत होतें, सेक्रेटरीएटमध्यें नोकरी मिळण्यासाठीं दादाभाईनीं खटपट केली, व त्या दिशेनें थोडासा प्रयत्न करताच १४० रुपये दरमहाची नोकरी त्यांच्यापुढें तयार झाली. अशी चांगली नोकरी चटकन् धरून टाकावी असें माणकबाईचें म्हणणें पडलें, व दादाभाईही यास प्रतिकूल नव्हते परंतु तसा योगायोग नव्हता. एल्फिन्स्टन कॉलेजचे प्रिन्सिपॉल पॅजेटसाहेब यांजवर दादाभाईची फार भक्ति होती, व त्यांचा विचार घेतल्याशिवाय कोणचीही महत्त्वाची गोष्ट करावयाची नाहीं, असें त्यांनीं ठरविलें होतें. त्याप्रमाणें ही नोकरी धरण्यापूर्वी ते पॅजेटसाहेबास भेटावयास गेले.

सेक्रेटरिएटमध्यें नोकरी धरण्याचा आपला विचार आहे, असें दादाभाईंना सांगताच पॅजेटसाहेब एकदम ओरडून म्हणाले, "you are a fool!" "तुला कांहीं कळत नाहीं" नतर त्यानीं दादाभाईस स्पष्ट सागितलें कीं, असली नोकरी तूं धरावीस हें मला पसत नाहीं पॅजेटसाहेबावर दादाभाईंचा विश्वास असल्या मुळें त्यानीं या नोकरीचा नाद सोडून दिला पॅजेटसाहेबाच्या या नापसतीमुळें हिंदुस्थानचें केवढें हित झालें बरें! नाहीं तर आपल्या राष्ट्रातील एक असामान्य पुरुष कारकुनीच्या हमालखान्यात काबाडकष्ट करीत कुजत पडला असता मोठे-पणींही दादाभाईंच्या मनांत हा विचार वारंवार येई आणि ते म्हणत कीं, "त्या वेळीं जर मीं ती नोकरी धरली असती तर देशसेवेंत आयुष्य घालविण्याच्या माझ्या कल्पनाना कारकुनशाहीच्या खडेंघाशींत समाधि मिळाली असती"

## प्रकरण दुसरें

# नोकरी व सार्वजनिक चळवळीचा प्रारंभ

दादाभाईनीं कारकुनाची नोकरी धरणें जितकें अनिष्ट होतें तितकेंच नोकरी-वांचून राहणें त्यास अशक्य होतें त्यामुळें नोकरीचा प्रश्न सोडविणें त्यांस अवघड वाटू लागलें शेवटीं, नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या चालकांनीं दादाभाईच्या नोकरीचा प्रश्न सोडविला त्यांचें त्याच्यावर फार प्रेम होतें, व आपल्या शाळेच्या मुख्य नेटिव्ह शिक्षकाची जागा त्यांनीं दादाभाईस सन १८४७ मध्यें देऊ केली हें काम दादाभाईच्या विद्याव्यासंगास पोषक असेंच होतें आपल्या कामावर रुजूं होतांच त्यांनीं इतक्या मनापासून कामास सुरुवात केली कीं, चालकमंडळी त्यांच्यावर अगदीं खूष झाली वर्षाच्या अखेर शाळेच्या बक्षीससमारंभाच्या वेळीं प्रिन्सिपॉल हार्कनेससाहेब यांनीं दादाभाईच्या कामाची फार तारीफ केली आणि दादाभाईस एक सुवर्णपदक देण्यात आलें

**शिक्षकाची नोकरी**

हॉवर्डसाहेबाचें चरित्र वाचल्यापासून दादाभाईच्या मनावर काय परिणाम झाला तो मागें सांगितलाच आहे परोपकार हेंच आपल्या आयुष्यातील मुख्य कर्तव्य असें दादाभाईनीं ठरविलें होतेंच, आता तें कार्य करण्यास लागण्याच्या सुसंधीची ते मार्गप्रतीक्षा करीत होते.

**सामाजिक कार्य : स्त्री-शिक्षण**

शिक्षकाची नोकरी करावयास लागल्यावर त्यांना सर्व वेळ काम नसे तेव्हा रिकाम्या वेळांत कांहीं तरी समाजसेवा करावी असें त्यांनीं मनात आणिलें प्रारंभ करण्याचा बेत झाला, अंतःकरणाची तळमळ होती, तरी प्रत्यक्ष कामाची सुरुवात कोठें व कशी करावी हें ठरविणें फार कठीण पडलें. समाज अतिशय अज्ञानी, मागसलेला आणि पुराणाभिमानी होता याबद्दल वाद नव्हता. परंतु या समाजाची सुधारणा करण्यास कोणत्या दिशेनें आरंभ करावा हें दादाभाईस ठरविता येईना. धर्मासंबंधानें खरी माहिती कोणाला नाहीं, परस्पर सहकारिता हा काय पदार्थ आहे हें कोणास ठाऊक नाहीं, विद्येची, शोधकतेची, कल्पनेची आवड नाहीं, पैशाचा उपयोग सत्कार्यांत करण्याची इच्छा

नाहीं—अशा प्रकारें समाजाची स्थिति अगदीं हीन, दीन, दुबळी झालेली होती, हें दादाभाईस स्पष्ट दिसत होतें हा दुबळेपणा घालविणें आपलें कर्तव्य आहे, कारण आपलें इतकें शिक्षण झालें हें केवळ दुसऱ्यांच्या परोपकारी स्वभावामुळें झालें, इतर लोकांच्या साहाय्यामुळें आपण वाढलों, ही त्याना चांगली जाणीव होती. पण या दुबळेपणाच्या गळवाला तोंड कसें व कोठें पाडावें याचा विचार करूं लागतांच त्यांचें मन गोंधळून जाई लोकांना कोणत्या बाबींत प्रथम जागृत करावें, आपल्या कार्याला मोठमोठ्या लोकांची मदत कशी मिळवावी, या कामाला लागणारा पैसा कोठून आणावा, बरोबरीनें काम करणारी उत्साही तरुण मंडळी कशी जमवावी, वगैरे प्रश्नांचीं उत्तरें आपल्या मनाशीं ठरविण्यांत दादाभाईंनीं अनेक रात्री व दिवस घालविले. होतां होतां स्त्री-शिक्षणाच्या कामासाठीं खटपट करण्यापासून समाजसेवेला प्रारंभ करण्याचें त्यांनीं निश्चित केलें.

शाळेंतील ठराविक नोकरी झाल्यावर जो वेळ मिळेल तेवढ्यात मुलींना शिक्षण द्यावें असा बेत ठरवून आपल्याला या कामीं साहाय्य कारण्याला कोण तरुण मंडळी पुढ येण्यासारखी आहेत, हें दादाभाई शोधूं लागले धनजीभाई कामा व करशेटजी कामा या दोन जुन्या समाजसुधारकांनीं त्यांना मदत करण्याचें कबूल केलें लवकरच कॉलेजांतील शिक्षण घेतलेले तीन चार तरुण त्यांना साहाय्य करण्यासाठीं तयार झाले या सर्वांनीं मिळून "वाङ्मय व शास्त्र यांची चर्चा करणारी विद्यार्थी मंडळी" (Students Literary & Scientific Society) काढली व एका घराच्या ओसरीवर या मंडळीची मुलींची शाळा सुरू झाली. तुम्ही आपल्या मुली आमच्या शाळेंत शिकावयास पाठवा अशी पुष्कळ गृहस्थांची दादाभाईंना विनवणी करावी लागली. मुलींना शिक्षण देणे ही गोष्ट त्या वेळीं अद्भुतच होती, मुलींना शिकविल्यापासून काय फायदा आहे याची फारशी कल्पना लोकांना नव्हती. दादाभाई प्रत्येकाला विनवून सांगत कीं, प्रयोगादाखल तरी स्त्री-शिक्षणाला तुम्ही प्रोत्साहन द्या. स्त्रीशिक्षणापासून फायदाच होईल, तोटा कांहींच होणार नाहीं. परंतु दादाभाईवर लोकांचा विश्वास होता म्हणूनच त्यांना थोडें यश आलें. हें काम दादाभाईनें सुरू केलें आहे, तेव्हां यांत कांहीं भिण्यासारखें नाहीं, अशा समजुतीवर पुष्कळ गृहस्थांनीं आपल्या मुली या मंडळीच्या शाळेंत पाठविल्या. तथापि बहुजनसमाज आपल्याविरुद्ध जाणार हें दादाभाई जाणून होते; म्हणून या लोकगंगेचा प्रतिगामी ओघ आपल्या

मार्गे ओढून वळविण्याची त्यांनीं युक्ति योजिली समाजांत द्रव्याच्या जोरावर व सन्मानाच्या आधारावर श्रेष्ठ समजलीं जाणारीं जीं कांहीं चार माणसें असतील तेवढ्यांची अनुकूलता आपल्याला लाभल्यास लोकमताचा वारा आपल्याला पाहिजे तसा वाहूं लागेल असें धोरण बांधून त्या बड्या गणलेल्या लोकांची सहानुभूति मिळविण्याचा प्रयत्न त्यांनीं सुरू केला त्या वेळीं पार्शी ज्ञातींत सर जमशेठजींच्या इतकी मान्यता दुसरी कोणाची नव्हती, जमशेठजी म्हणजे पार्शी समाजाच्या गलबताचें सुकाणूं होते तेव्हां या शेठजींना आपल्या बाजूस वळविण्याचें दादाभाईंनीं ठरवून त्यांच्या बगल्यावर सकाळ संध्याकाळ हेलपाटे घालण्याचा क्रम सुरू केला. शेठजी बाहेर गेलेले असले तर त्यांच्या बगल्याच्या पडवींतच त्यांची वाट पहात बसावें, ते आल्यावर बेताबेतानें आपला उद्देश त्यांना कळवावा, अशी जोराची मोहीम त्यांनीं सुरू केली त्या वेळच्या प्रयत्नाच्या गोष्टी निघाल्या म्हणजे मोठेपणीं दादाभाई म्हणत कीं, " जमशेठजींच्या बंगल्यावर मीं धरणेंच घेतल्यासारखें केलें. त्यांना असें झालें कीं, नको ही ब्याद. मलाही तें कळत नव्हतें असें नाहीं, पण तसें केल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें" अशाच प्रकारचे अविश्रांत व नेटाचे प्रयत्न करून जमशेठजींच्याप्रमाणेंच इतर कांहीं थोर मंडळींचें व नंतर एकंदर समाजाचें साहाय्य दादाभाईंनीं संपादन केलें.

दादाभाईंनीं सुरू केलेली ही मुलींची शाळा मोठ्या प्रमाणावर किंवा निर्दोष अशी होती असें नव्हे. तथापि, हल्लीं ज्या मोठमोठ्या मुलींच्या शाळा सर्वत्र झाल्या आहेत, त्यांचें हें उगमस्थान म्हणून तिला महत्त्व आहे. मुंबई शहरांत आज दृष्टीस पडणाऱ्या मुलींच्या शाळांची जी सुस्थिति, लोकप्रियता व कार्यक्षमता आढळून येते, त्या सर्व गोष्टींचें श्रेय दादाभाईंच्या ह्या लहान प्रमाणावर काढलेल्या शाळेच्या खटपटीलाच द्यावें लागेल " स्त्री-शिक्षणाचे जनक " असें जें दादाभाईंना म्हणतात तें अगदीं अन्वर्थक आहे ह्यांत शंका नाहीं

हा आपला स्त्री-शिक्षणाचा प्रयत्न साधारणपणें यशस्वी झाल्यावर दादाभाईंनीं लोकशिक्षणाच्या दुसऱ्या एका भागाकडे दृष्टि वळविली शिक्षणाशिवाय समाजांतील अज्ञान नाहींसें व्हावयाचें नाहीं हें समजून त्यासाठीं त्यांची फार तळमळ होती. जनसमूहाला सुशिक्षित करून त्यांच्या विचारांना योग्य वळण लावण्यास वर्तमानपत्र हें एक अत्युत्तम साधन आहे, म्हणून तसलें साधन उत्पन्न केलें पाहिजे असें त्यांच्या मनानें घेतलें; व लगेच त्या दिशेनें खटपट करण्याची त्यांनीं सुरुवात केली. धनिक

**वर्तमानपत्र**

पुढाऱ्याच्या मदतीनें त्यांनीं भांडवल जमविलें, आपल्या बरोबरीच्या सुशिक्षितास निरनिराळ्या विषयांवर लेख लिहिण्याची विनंति केली, त्या वेळीं उपलब्ध असलेलीं छपाईचीं साधनें पैदा केलीं, आणि सन १८६१मध्यें 'रास्त गोफ्तार' या नांवाचें साप्ताहिक वर्तमानपत्र दादाभाईंच्या संपादकत्वाखालीं प्रसिद्ध होऊं लागलें 'रास्त गोफ्तार' म्हणजे 'खरी बातमी' या नांवाप्रमाणेंच कृति करण्याचा दादाभाईंचा संकल्प होता. आपल्या वर्तमानपत्राच्या वाचनानें लोकांचीं मनें सुसंस्कृत व्हावीं, त्यांना विद्येची अभिरुचि लागावी, त्यांची जिज्ञासा जागृत व्हावी, असा दादाभाईंचा हेतु असल्यामुळें पत्राची किंमत मुद्दाम अगदीं थोडी ठेविली होती लोकांची उन्नति करण्याच्या धोरणानें या पत्रांत विविध विषयावर लेख येऊं लागले दादाभाईंनीं स्वतः या पत्रांत लेख, निबंध व स्फुटें लिहिलीं शिवाय " सॉक्रेटीस व डायोजीनिस यांचे संवाद ", " समाचारदर्पण " पत्रात प्रसिद्ध झाले, ते दादाभाईंच्या हातचेच होते दोन वर्षेपर्यंत हें " रास्त गोफ्तार " पत्र नीट रीतीनें चालविल्यानंतर त्यास जरा स्थैर्य आलेसें पाहून त्याची व्यवस्था दुसऱ्या लोकांच्या स्वाधीन करून दादाभाई त्या जबाबदारींतून मोकळे झाले.

समाजामध्यें धर्माविषयीं खऱ्या-खोट्या कल्पनांची गुतागुत झालेली दादाभाईंच्या निदर्शनास आली धर्म म्हणजे कर्मठपणा आणि धर्मविहित लहानसहान कर्मांचें उल्लंघन म्हणजे अधर्म अशी समजूत समाजामध्यें मुरून बसली होती.

**इतर संस्था**

स्त्री म्हणजे पुरुषाचा गुलाम, विकत घेतलेला सत्तेचा नोकर, आणि स्त्री-पुरुषांमधील परस्पर सघटन विशेष वाढणें ही अधर्माची गोष्ट, असलीं स्त्रीवर्गाच्या हितास विघातक मतें धर्मपरायणतेच्या पांघरुणाखालीं समाजात पोसलेलीं होतीं यासाठीं लोकांना धर्माचा खरा मार्ग दाखविण्याच्या हेतूनें सन १८५१ सालीं इतर मंडळींच्या साहाय्यानें दादाभाईंनीं 'धर्ममार्गदर्शक' नांवाचें एक मंडळ स्थापन केलें व त्याचें कार्य स्वतः आपल्या अगावर घेतलें. या मंडळीचा मुख्य उद्देश असा होता कीं, हिंदुस्थानांत पार्शी लोक राहावयास आल्यापासून समाजाच्या प्रगतीला अडथळा करणाऱ्या ज्या कित्येक चाली इतर धर्मांच्या सहवासाने त्यांच्यांत शिरल्या किंवा त्यांना घ्याव्या लागल्या, त्या चाली नाहींशा करण्याचा प्रयत्न करावयाचा. उदाहरणार्थ, बालविवाहाची चाल किंवा रूढि मूळच्या पार्शी धर्मांतील नसतांना, गुजराथी व इतर हिंदु लोकांच्या आश्रयानें हिंदुस्थानांत राहिल्यानंतर पार्शी

समाजानें ती उचलली होती. त्याचप्रमाणें स्त्री-पुरुषांमधील सलगी कमी होत जाऊन त्यांचीं अगदीं दोन निराळीं खातीं होऊं पहात होतीं. यासाठीं आपल्या बायकांमुलांस आपल्याजवळ बसवून घेऊन एकत्र जमून जेवण्याची व मन-मोकळेपणानें सभाषण करण्याची चाल पाडण्याचा या मंडळाच्या सभासदांनीं उपक्रम केला अशाच प्रकारच्या इतर उपायांनीं धर्माच्या ज्या पायावर समाज उभा होता, तो पाया शुद्ध करण्यासाठीं दादाभाईनी या मंडळाचें काम जोरानें चालविलें

"Students' literary and scientific Society" या मंडळाच्या कामाला फ्रामजी कावसजी या प्रसिद्ध पारशी गृहस्थांनीं फार मदत केलेली होती या गृहस्थांच्या मृत्यूनतर त्यांचें कांहीं तरी स्मारक करावें अशी कल्पना सन १८५१ मध्यें निघून त्याविषयीं बरीच चर्चा झाली शेवटीं, या स्मारकाबद्दल निश्चित कांहीं तरी ठरविण्यासाठीं कांहीं ठळक ठळक मंडळींची बैठक सप्टेंबरच्या २२ व्या तारखेस बोलावण्यात आली. फ्रामजी कावसजींनीं केलेलें साहाय्य दादाभाई कृतज्ञपणानें स्मरत होते, व आपल्या मडळाकडून कावसजींच्या स्मारकास चांगली मदत झाली पाहिजे असें त्यांस फार वाटत होतें. म्हणून त्यांनीं पुष्कळ खटपट करून सहा हजार रुपये जमविले व या बैठकीच्या वेळीं आपल्या सभेच्या मार्फत ते पैसे कावसजींच्या स्मारकास देऊं केले स्मारकाची पुढील व्यवस्था करण्यासाठीं या बैठकींत एक पोट-कमिटी नेमण्यांत आली. त्यांत दादाभाईंचा समावेश केला होता. व्याख्यानासारख्या लोकशिक्षणाच्या कामाला उपयोगी पडण्यासारखा एक मोठा हॉल कावसजींच्या स्मरणार्थ बांधावा असें या पोट-कमिटीनें ठरविलें सन १८६२ च्या फेब्रुवारी महिन्यांत या इमारतीच्या पायाचा दगड बसविण्यांत आला आणि हा हॉल बांधून झाल्यावर पूर्वी सन १८४५ मध्यें स्थापन झालेली नेटिव्ह जनरल लायब्ररी या इमारतींत सन १८६४ सालीं आणण्यांत आली; व सन १८६८ च्या फेब्रुवारीच्या २४ व्या तारखेस हें स्मारक उघडल्याचें जाहीर करण्याचा समारंभ झाला

दादाभाईंच्या कित्येक त्रोटक चरित्रांत व्हिक्टोरिया आलबर्ट म्यूझियम्, व नेटिव्ह जनरल लायब्ररी या दोन्ही संस्था दादाभाईनीं स्थापन केल्या अशी माहिती दिलेली आढळते परंतु या संस्थांच्या चालकांकडे चौकशी करतां असें कळतें कीं, यांपैकीं कोणच्याही संस्थेशीं दादाभाईंचा तशा तऱ्हेचा संबंध लागत

नाहीं. त्याप्रमाणेंच इराणी फंड, व पारशी व्यायामशाळा या संस्था दादाभाईंनीं सुरू केल्या असें कोणी म्हणतात; परंतु तशी नक्की माहिती मिळत नाहीं

अशा प्रकारें सामाजिक व धार्मिक दिशेनें खटपट केल्यानंतर साहजिकपणेंच दादाभाईंची दृष्टि राजकीय विषयाकडे वळली त्या वेळीं हिंदुस्थानचा राज्यकार भार ईस्ट इंडिया कंपनीच्या हातांत होता कंपनीचे नोकर लोक वाटेल तसा आडदांडपणा करून गरीब प्रजेला पिळून काढतात, असें गव्हर्नर जनरल होऊन गेलेल्या कित्येक इंग्रजांच्या बोलण्यावरून व लिहिण्यावरून दादाभाईंस समजून आलें कंपनीच्या नोकरांचा असा अन्यायक्रम चालतो याचें कारण, न्याय कसा मिळवावा व आपले हक्क कसे संभाळावे हें हिंदुस्थानच्या लोकांस कळत नाहीं, म्हणून राजकीय गोष्टींविषयीं लोकांना ज्ञान मिळणें अत्यंत जरूर आहे असें पाहून दादाभाईंनीं इतर मंडळींचें साहाय्य मिळवून "Bombay Presidency Association"-मुंबईइलाखा सभा—नांवाची संस्था सन १८५३ मध्यें स्थापन केली लहान-मोठ्या राजकीय बाबींची या सभेंत चर्चा होऊं लागली आणि व्याख्यानद्वारा लोकास त्यांचे हक्क समजावून देण्याचें काम या सभेच्या मार्फतीनें सुरू झालें राजकीय गोष्टींसंबंधानें राजा व प्रजा याना सांधणारा हा एक दुवा दादाभाईंनीं घडविला असें म्हटल्यास हरकत नाहीं

असो दादाभाई ज्या नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीच्या शाळेंत शिक्षकाचें काम करीत असत, त्याच सोसायटीनें एल्फिन्स्टन कॉलेजही चालविलेलें होतें

**प्रोफेसरची जागा**

या कॉलेजमध्यें गणित व निसर्गशास्त्र या विषयांचे अध्यापक पॅटनसाहेब होते ते सन १८५४ मध्यें हिंदुस्थानातून गेल्यामुळें त्यांची जागा रिकामी झाली सोसायटीच्या चालकास दादाभाईंविषयीं प्रेम वाटत होतें व शिक्षक या नात्यानें त्यांची वाखाणणीही झाली होती तेव्हां त्यांना ही रिकामी जागा द्यावी असें सोसायटीच्या चालकांनीं ठरविलें. कॉलेजांतील अध्यापकाची जागा मिळाल्याबद्दल दादाभाईंस आनंद झाला, व एतद्देशीय माणसास सन्मानाची मोठी जागा देण्याची नेटिव्ह एज्युकेशन सोसायटीची तयारी पाहून समाजांतील पुढाऱ्यानाही संतोष वाटला. हिंदुस्थानात कोठेंही प्रोफेसरची जागा एतद्देशीय विद्वानास दिल्याचें उदाहरण नव्हतें त्यामुळें ही कॉलेजांतील अध्यापकाची जागा मिळाल्याबद्दल दादाभाईंचें नांव सर्व हिंदुस्थानांत प्रसिद्ध झालें. मुंबई

इलाख्याच्या बाहेर दादाभाईंच्या नांवाची कीर्ति जाण्याचा हा पहिलाच प्रसंग होय. डॉ० एम्. स्टॉवेल यांनीं या प्रसंगीं दादाभाईस एक गौरवपूर्ण पत्र लिहिलें व " तुमच्या अंगच्या सद्गुणांचा उत्तरोत्तर विकास होऊन तुम्ही आपली स्वतः-ची व आपल्या देशाची कीर्ति वाढवाल अशी मला आशा आहे " असें त्यांस प्रोत्साहन दिलें.

या मोठ्या जबाबदारीच्या जागेचें काम उत्तम प्रकारें बजाविण्याचा दादा-भाईनीं निश्चय केला शिकविण्याच्या बाबतींत होईल तितकी सुधारणा करून आपलीं व्याख्यानें विद्यार्थ्यांस सुलभ, माहितीनें भरलेलीं व सुश्राव्य वाटावीं याबद्दल त्यांनीं हरप्रयत्न केले त्या वेळचीं दादाभाईंचीं व्याख्यानें ऐकलेले बरेच लोक हल्लीं मोठ्या मोठ्या हुद्द्यावर आहेत. ते असें सांगतात कीं, दादाभाईंच्या स्वभावाविषयीं मोठा आदर आणि त्यांच्या शिकविण्याबद्दल अतिशय समाधान व प्रेम वाटत असे. त्यांपैकीं डॉ० रामकृष्ण गोपाळ भांडारकर यांनीं अनेक वेळां बोलून दाखविलें आहे कीं, दादाभाईंचें शिकविणें व त्यांचें विद्यार्थ्यांवरील प्रेम आम्ही जन्मभर विसरणार नाहीं प्रोफेसर दादाभाईंस विद्यार्थी फार मानीत असत आणि त्यांचें नांव निघतांच त्याना फार प्रेम वाटत असे 'प्रोफेसर' या पदवीबद्दल दादाभाईंसही फार भूषण वाटे, आणि त्याबद्दल त्यांनीं एके ठिकाणीं असें लिहिलें आहे कीं, " माझ्या जन्माच्या अवधींत मला अनेक सन्मानाच्या जागा मिळाल्या, परंतु 'प्रोफेसर' म्हणवुन घेण्यांत मला जी धन्यता वाटे, ती दुसऱ्या कोणत्याही पदवींत अगर जागेबद्दल मला वाटली नाहीं."

दादाभाईंचें अध्यापकाच्या जागेचें काम इतकें चोख व प्रशंसनीय झालें कीं, सन १८५४–५५ सालचा जो रिपोर्ट शिक्षणखात्याच्या बोर्डानें प्रसिद्ध केला, त्यांत दादाभाईंच्या नेमणुकीसंबंधानें फार स्तुतिपर उद्गार काढले होते, आणि दादा-भाईंसारखीं हिंदी माणसें पुढें आलीं तर हिंदुस्थानची उन्नति लवकरच होईल असें मत प्रदर्शित केलें होतें. आतां दादाभाईंचा जन्म प्रोफेसरींत जाणार या-संबंधानें कांहीं शंका उरण्याचें कारण नव्हतें, आणि हें आवडीचें शिक्षणाचें काम कधीं काळीं आपण सोडूं असें दादाभाईंना स्वतःलादेखील वाटलें नसेल. परंतु विधिघटना कांहीं वेगळीच होती. गणितविषय शिकविण्यांत दादाभाईंचा सारा जन्म वांया जावा व ही गोष्टच त्यांच्या थोरपणाची अखेरी व्हावी अशी विधि-घटना नव्हती. त्यांच्या अंगीं नेटानें काम करण्याचा कसा जोम आहे, व त्यांची

थोरवी किती आहे, हें लोकास पटविण्याचें एक साधन म्हणूनच केवळ दादाभाईंना मिळालेला हा अध्यापकत्वाचा मान परमेश्वरानें खपवून घेतला, खरोखर, त्यांच्या मोठेपणाच्या शिडीची ही पहिली पायरी होती त्या पायरीवर दादाभाईंनीं चढावें परतु तेथेंच न थाबता आणखी शिडीच्या पायऱ्या चढत जावें, असा ईश्वरी संकेत होता प्रोफेसरची जागा ही दादाभाईंच्या कार्याची व लौकिकाची अखेरची स्थिति नसून तो केवळ प्रारंभ होता, व या दिशेनें त्यांच्या आयुष्याचा प्रवाह वाहणार आहे, हें जरी त्यांना स्वतःला किंवा त्याच्या हितचिंतकांनाही समजलें नाहीं तरी जगताचीं सूत्रें हालविणाऱ्यानें हा केवळ पहिला डाव मांडला होता व त्याप्रमाणेंच पुढील डावांची त्यानें तयारी चालविली होती.

प्रकरण तिसरें

# व्यापार आणि विलायतेंतील कामाचा आरंभ

दादाभाई लहान होते तेव्हां त्यांच्या घरीं वारंवार जाणारे एक कामा नांवाचे व्यापारी होते दादाभाईची बुद्धिमत्ता, कार्यक्षमता, त्यांची दानत व सत्य प्रियता पाहून कामाना दादाभाईविषयीं फार आदर वाटत असे या कामांच्या घराण्याचा व्यापार फारच मोठा असे या कामा बंधूजवळ कोट्यवधींचें भांडवल होतें व आपल्या व्यापाराचा विस्तार वाढविण्याची त्यांना फार हौस होती हिंदुस्थान देशांतल्या देशांत व्यापारास मोठें क्षेत्र नाहीं, आपला धंदा परदेशींच्या व्यापारी शहरात चालविला पाहिजे, अशी त्यांची धमकीची इच्छा होती सन १८५५ सालच्या सुमारास त्यांचे हे विचार फारच बळावले व लंडन येथें आपली एक शाखा काढण्याचें त्यांनीं ठरविले त्या शहरात आपल्या पेढीची शाखा स्थापन करावयाची झाल्यास तेथें कोणी तरी सुशिक्षित, हुषार, दीर्घोद्योगी आणि प्रामाणिक माणूस नेमून त्याच्या ताब्यात तेथील कारभार देणें अवश्य आहे असें त्यांस वाटलें अशा मनुष्याचा शोध करण्याचा प्रयत्न सुरू करतांच त्यांना आढळून आलें कीं, यासाठीं आपल्याला फार लाब जावयास नको. आपल्या जवळच दादाभाई आहे, त्याच्या ताब्यात लंडन येथील पेढी दिल्यास फार उत्तम होईल असा त्यांचा विचार ठरल्यानंतर या गोष्टीबद्दल दादाभाई काय म्हणतो हें विचारण्यासाठीं ते त्याच्याकडे आले दादाभाईस नोकर किंवा मुनीम तरी कसें म्हणावें, तें त्याच्यासारख्या माणसाला शोभणार नाहीं, असें त्यांना वाटलें. तेव्हां दादाभाईला आपला भागीदार करावा असा निश्चय करून तशी आपली इच्छा त्यांनीं दादाभाईपुढें मांडली. या गोष्टीस एकदम रुकार देणें दादाभाईस शक्य नव्हतें. कामाच्या सूचनेचा त्यांनीं अनेक दृष्टींनीं विचार केला. प्रोफेसरची जागा कायम धरून राहिल्यास येथल्या येथें काय कार्य करतां येईल आणि व्यापारी पेशानें विलायतेस गेल्यास कोणची देशसेवा करण्यास सुलभ जाईल, पेढीची कामगिरी आपणास झेंपेल किंवा नाहीं, विलायतेस जाऊन राहिल्यास काय अडचणी येतील, कोणकोणत्या संकटांना आपल्यास तोंड द्यावें लागेल वगैर

अनपेक्षित दिशा

लहानसहान व मोठ्या गोष्टींचा दादाभाईंनीं आपल्या मनाशीं पूर्ण विचार केला व अखेर विलायतेस जाण्याचें त्यांनीं ठरविलें. त्यांचा निश्चय ऐकून कामा बंधूंस अत्यानंद झाला इंग्लंडांत गेल्यावर तिकडे जाणाऱ्या हिंदुस्थानांतल्या विद्यार्थ्यांच्या व व्यापाऱ्यांच्या अडचणी दूर करावयाच्या व हिंदुस्थान आणि इंग्लंड या दोन्ही देशाचा परस्परसंबंध अधिक स्नेहपूर्ण होईल असा प्रयत्न करावयाचा, असा हेतु मुख्यत्वेंकरून दादाभाईंच्या मनात त्या वेळीं होता. आपल्याला राजकीय कामांत पडावें लागेल ही कल्पनाही त्यांना त्या वेळीं नव्हती हिंदी राष्ट्राच्या कट्टया कैवाऱ्याला राजकीय रणांगणावर अगदीं अचानक नकळत नेऊन ठेवणाऱ्या दैवाच्या या मार्मिक लीलेचा जों जों विचार करावा, तों तों मनांतील साश्चर्यानंद दुणावतो

दादाभाईस बॅरिस्टरीचा अभ्यास करण्यासाठीं विलायतेस पाठविण्याचा सन १८४५ सालीं प्रयत्न करणारे अर्स्किन पेरीसाहेब हे या वेळीं म्हणजे सन १८५५ मध्यें इग्लंडांत होते कामाच्या पेढीची शाखा उघडण्यासाठीं दादाभाई विलायतेस गेल्यावर तेथें त्यांची व पेरीसाहेबांची भेट झाली दादाभाईस पाहून त्यांना फार आनंद झाला, आणि आपली पूर्वीची इच्छा इतक्या उशिरानें व अन्य तऱ्हेनें कां होईना पण सफल झाली, याबद्दल पेरीसाहेबाना संतोष वाटला. त्यानीं दादाभाईचें अभिनदन केलें आणि जी काहीं मदत लागेल ती देण्यास मी सदैव उत्सुक राहीन असें आश्वासन दिल

ठरलेल्या योजनेप्रमाणें लंडन येथें शाखा उघडून कामा बंधूंचा व्यापार सुरू झाला हिंदुस्थानांत होणारा माल विलायतेस पाठवावयाचा व तिकडील माल हिंदुस्थानांत आणावयाचा असा आयात व निर्गतचा (Import & Export) धदा कामाबधूंचा होता व्यापाराची पूर्वी काहींसुद्धां माहिती नसता थोड्याच दिवसांत दादाभाईंनीं आपल्या धद्यातील सर्व खुब्यांची माहिती करून घेतली इंग्लंडमध्यें ही पहिलीच हिंदी पेढी होती, व त्यामुळें आपल्यावर फार मोठी जबाबदारी आहे असें दादाभाईस वाटे. आपल्या शाखेचा जम बसून धंद्यांत भरभराट झाली व तिच्यावर परदेशांतील व्यापाऱ्यांचा विश्वास बसला, तर हिंदी लोक व्यापारास लायख आहेत, हिंदी व्यापारी कर्तबगार व विश्वासू आहेत, आणि त्यांच्या अंगीं धाडस आहे, असें सिद्ध होईल; आणि याच्या उलट या शाखेला धक्का बसून तिची जर पत नाहींशी झाली तर सर्व हिंदुस्थानची बेअब्रू

होईल; तेव्हां या बाबतींत आपल्यावर फार मोठी जबाबदारी आहे, असें दादाभाईंच्या मनांत रात्रंदिवस येई ही जाणीव मनांत बागवून त्यांनीं आपल्या वर्तनासंबंधानें फार दक्षता ठेवली होती हिंदी व्यापाऱ्यांची पत चांगली राहिली पाहिजे हें त्यांचें धोरण होतें, व त्यांनीं आपल्या धंद्यांत विलक्षण सचोटी दाखविली. परंतु काम करतांना जो भोळेपणाचा अतिरेक त्यांनीं होऊं दिला, तो टाळतां आला असता तर बरें झालें असतें कारण ह्या त्यांच्या भोळसर स्वभावानें व फाजील विश्वास टाकण्याच्या खोडीनेंच पुढें त्यांची स्वतःची फर्म बुडाली असें पुष्कळांचें मत आहे ह्या त्यांच्या अवास्तव भरवसा ठेवण्याच्या वृत्तीचें एक उदाहरण सांगण्यासारखें आहे. पुढें, म्हणजे सन १८६७ सालीं, त्यांनीं स्थापन केलेल्या ईस्ट इंडियन ॲसोसिएशनचा एक युरोपियन नोकर होता त्याच्याकडे हिशेब ठेवणें वगैरे जबाबदारीचीं कामें होतीं तेव्हा जमाखर्चांचा घोटाळा करून पैसे खाण्यास त्याला चांगली साधि होती दादाभाईंच्या जवळ राहणारे दुसरे एकदोन पार्शी, प० वा० फेरोजशहा मेथा व सध्यां बॅरिस्टर असलेले होरमसजी वाडिया, यांना त्या युरोपियन नोकराविषयीं संशय आला. कारण वाटेल तशी चैन करतांना व पाहिजे तसे पैसे उधळतांना अनेक वेळां तो त्यांच्या नजरेस पडला हा युरोपियन नोकर ॲसोसिएशनचे पैसे उपटून चैन करीत असला पाहिजे, व आपला संशय खरा असेल तर ही नुकसानीची गोष्ट उघडकीस आणली पाहिजे, असें वाडिया, फेरोजशहा मेथा वगैरे मंडळींना वाटू लागलें. त्यांनीं आपल्याला आलेल्या संशयाची गोष्ट दादाभाईंस सांगितली, पण त्यांना तें खरें वाटेना ते म्हणाले, " एखाद्या माणसाविषयीं असा वेडावाकडा संशय घेणें चांगलें नव्हे. त्या माणसाला मीं नोकरीवर ठेवला आहे व त्याच्यावर पूर्ण विश्वास टाकल्याखेरीज मला माझें काम करतां येणार नाहीं. गणितांतल्या सिद्धान्ताप्रमाणें बिनतोड पुरावा आणून तुम्हीं आपला संशय खरा करून दाखविल्याशिवाय मी तुमचें म्हणणें ऐकणार नाहीं तुसत्या तर्कानें उत्पन्न झालेल्या संशयाला कांहीं किंमत नाहीं " पण सांगावयाची गोष्ट अशी कीं, अखेर वाडियांचा तर्कच खरा ठरला कांहीं कामानिमित्त दादाभाई हिंदुस्थानांत आले होते, ही संधि पाहून त्या युरोपियनानें ॲसोसिएशनच्या हिशेबांत अफरातफर करून हजारों रुपये आपल्या खिशांत भरले आणि ॲसोसिएशनच्या जमाखर्चांचा बोजवारा करून इंग्लंडला रामराम ठोकला. असो

## व्यापार व विलायतेंतील कामाचा आरंभ

सन १८५५ पासून दादाभाईंनीं हा व्यापारी पेशा पत्करला. इंग्लंडमध्यें असतांना तेथील अनेक निरनिराळ्या संस्थांशीं त्यांनीं निकट सबंध ठेवला होता. मॅंचेस्टर येथील व्यापाऱ्यांच्या धंद्याच्या पद्धतीचें पूर्ण ज्ञान करून घेतलें पाहिजे असें त्यांना वाटूं लागलें. हिंदुस्थानांतला कच्चा माल शक्य तितक्या स्वस्त दरानें आपल्या पदरांत पाडून घेऊन परत पक्का माल पाठवितांना तो होईल तितक्या महाग भावानें जावा म्हणून लॅंकाशायरचे गौरवर्ण गिरणीवाले कसे कसे डावपेंच लढवितात, याची पूर्ण माहिती करून घेतल्याशिवाय त्या गोऱ्या मारवाड्याचें नाक हिंदी व्यापाऱ्याच्या हातीं लागणार नाहीं, असें दादाभाई नेहमीं म्हणत आणि त्या हेतूनें "Cotton supply Association of Manchester" "मॅंचेस्टरची कापूसपुरवठा करणारी मडळी"चे ते सभासद झाले होते. शिवाय कांहीं दिवस ते लंडन युनिव्हर्सिटी कॉलेजमध्यें गुजराथी भाषेचे प्रोफेसरही होते तेथील सीनेटचे सभासद होण्याचाही मान त्यांस मिळाला Queen Insurance Co.चे ते डायरेक्टर झाले होते सन १८६२ मध्यें जें प्रदर्शन झालें त्याचे ते व्यवस्थापक guarantor होते शिवाय आणखी ज्या कित्येक मंडळांच्या व संस्थाच्या कामामध्यें ते मोठ्या आवडीनें भाग घेत असत, त्यांपैकीं कांहींचीं नांवें अशीं होतीं :—

[१] Liverpool Litarary and Philosophic Society. [२] Philomathic Society. [३] Council of the Liverpool Athenaeum. [४] Royol Institution of London. [५] Royal Asiatic Society of Great Britain & Ireland. [६] Ethnological Society. [७] Anthropological Society. [८] Society of Arts [९] National Indian Association.

व्यापारी बनल्यानंतर त्याच धंद्यामध्यें सर्वस्वीं मन घालून राहावें हा पार्शी लोकांचा स्वभाव असतांनाही दादाभाईंची तशी स्थिति झाली नाहीं उलट त्यांचें मन त्या कामापासून थोडथोडें परावृत्त होऊं लागलें. हिंदुस्थानाला जे अनेक रोग जडले आहेत त्यांपैकीं मुख्य रोग औद्योगिक नाहीं, तर राज्यकारभाराच्या हक्काची उणीव हा मुख्य दोष आहे असें त्यांना फार फार वाटूं लागलें. सुधारणा करावयाची तर या राज्यकारभाराच्या पद्धतींत ती अगोदर झाली पाहिजे, असें

त्यांचें मत बनत चाललें. इंग्लडमध्यें बसून जे मुत्सद्दी हिंदुस्थानासंबंधाचे कायदे करतात त्याच्यापेक्षां हिंदु लोकांवर प्रत्यक्ष राज्य करणाऱ्या कंपनीच्या नोकरांच्या अरेरावीपणामुळेंच अधिक अन्याय होतो, व या अन्यायाच्या आणि जुलमाच्या प्रतिकारार्थ तक्रार करावयाची ती हिंदुस्थानांतील वरिष्ठांकडे नेण्यापेक्षां खुद्द विलायतेंत पार्लमेंटकडे व त्यांतील राज्यसूत्र चालकांकडे पोंचविली तर बरें, अशीही त्यांची खात्री होत चालली.

**राजकीय चळवळीला प्रारंभ**

आता आपण अनायासें येथें आलों आहों तर या राजकीय सुधारणेसाठीं कशी खटपट केली पाहिजे, व ही कोंडी कोणच्या तऱ्हेनें फोडली पाहिजे, असले विचार त्यांच्या मनात आता रात्रदिवस घोळूं लागले.

या त्याच्या विचाराना पुष्टि मिळून ते प्रगट होण्याला हिंदुस्थानात एक कारण घडून आलें सन १८५७च्या बंडाची भयंकर आग उत्तर हिंदुस्थानांत पेटून शेंकडों युरोपियन लोकांचे त्यांत बळी पडले. गोऱ्या बायकापोरांची कत्तल उडाली, व उलट प्रतिकारात असंख्य हिंदी लोक तोफेच्या तोंडीं दिले गेले बऱ्याच ठिकाणीं उभय सैन्याच्या चकमकी होऊन भयंकर रक्तपात झाला, आणि या बंडापासून त्याच्या मुळाशीं असलेल्या लोकांचा उद्देश कोणच्याही प्रकारें सफल न होतां, लोकाना निःशस्त्र करण्याचा कायदा होऊन सर्व हिंदी लोकांच्या हातचीं शस्त्रें मात्र काढलीं गेलीं हा जो दुर्धर प्रसंग हिंदुस्थानांत घडून आला त्याविषयीं विचार करतां दादाभाईंस पक्कें वाटूं लागलें कीं, एकपक्षीं हिंदुस्थानात प्रत्यक्ष अधिकार गाजविणाऱ्या इग्रज नोकरांचा अम्मल प्रजेला दुःसह वाटूं लागला, व उलटपक्षीं, विलायतेंतील मुत्सद्दी लोकांना आपल्या कृत्यांचा कांहींच पत्ता न लागू देण्याची या नोकरानीं तजवीज ठेविली, त्यामुळें असला अनर्थ झाला तेव्हां हिंदुस्थानच्या राज्यकारभारांतील दोषाबद्दलचें गाऱ्हाणें प्रत्यक्ष ब्रिटिश पार्लमेंटापुढें मांडलें पाहिजे, नाहीं तर आणखी काय आपत्ति येईल कोणास ठाऊक! यासाठीं प्रथम राज्यकारभारांत सुधारणा करून घेण्यासाठीं मोठी चळवळ केली पाहिजे. त्यांच्या या विचाराला आणखी एका गोष्टीमुळें जोर आला. सत्तावन सालच्या बंडामुळें हिंदुस्थानचा कारभार ईस्ट इंडिया कंपनीच्या हातून काढून प्रत्यक्ष महाराणी सरकारनीं आपल्या हातीं घेतला. विलायतेंत एक इंडिया कौन्सिल नेमण्यांत येऊन त्याची देखरेख हिंदुस्थानच्या कारभारावर

असावी असें ठरलें; आणि पहिल्या कौन्सिलच्या सभासदांत सर अर्स्किन पेरी (Sir Erskine Perry) यांची तहाहयात नेमणूक झाली राजकीय चळवळ करण्याचा दादाभाईंचा निश्चय होण्यास आणि पेरीसाहेबांना कौन्सिल-मध्यें अधिकार मिळण्यास एक गांठ पडल्यामुळें दादाभाईंना अधिक उमेद आली त्यांनीं आपलीं मतें व निश्चय पेरीसाहेबांच्या जवळ बोलून दाखवितांच त्यांनीं संतोष व्यक्त करून दादाभाईंस पूर्ण उत्तेजन दिलें पेरीसाहेबांच्या या सहानु-भूतीनें दादाभाईंस विशेष उत्साह चढला, आणि राज्यकारभारांतील अन्यायरूपी शत्रूबरोबर पुढील पन्नास वर्षे त्यांनीं जें युद्ध केलें त्याचा पहिला घाव घालण्यास ते सज्ज झाले

प्रकरण चवथें

# कंपनी बुडाली–सिव्हिल सर्व्हिस

राज्यकारभाराच्या धोरणासंबंधानें दादाभाईंची व विलायतच्या कारभाऱ्यांची पहिली चकमक सन १८५९ सालीं झडली. सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेच्या नियमांमध्यें फेरफार करण्याचा बूट निघून त्यांत हिंदी लोकांच्या हिताला विघातक सूचना आणण्याचा विचार दिसूं लागला. ह्या योगानें हिंदी लोकांना परीक्षेला बहुतेक बंदी होऊन वरिष्ठ जागास मुकावें लागणार होतें. ही बातमी दादाभाईंस समजतांच त्यांनीं त्या वेळचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड स्टॅनले यांच्याशीं पत्रव्यवहार सुरू केला हिंदुस्थानांतील इंग्रजी राज्य हिंदी लोकांच्या संतोषाच्या पायावर उभें आहे, तेथील राज्यकारभार हिंदी लोकांच्या हातीं असणें हें निसर्गसिद्ध, न्याय्य व अत्यंत जरुरीचें आहे, आणि त्यामुळें त्या कारभारांतील कांहीं जागा हिंदी लोकांना मिळण्याचें जें सिव्हिल सर्व्हिस परीक्षेचें द्वार तें हिंदी तरुणांस बंद करण्यासारखी एक गोष्टदेखील इंग्रजांच्या राज्यास धोका आणण्यास पुरेशी आहे, वगैरे गोष्टींचें विवरण दादाभाईंनीं आपल्या पत्रांत पूर्णपणें केलें. अखेर दादाभाईंचें म्हणणें लॉर्ड स्टॅनले यास पटलें व " उघडपणें पूर्ण चर्चा झाल्याखेरीज इंडियन सिव्हिल सर्व्हिसच्या परीक्षेच्या नियमांत कांहींही फरक करण्यांत येणार नाहीं " असें त्यांनीं आश्वासन दिलें

इंडियन सर्व्हिसबद्दलचें भांडण सन १८६० मध्यें पुन्हा सुरू झालें. मंचरजी बयरामजी कोला या नांवाच्या एका पार्शी तरुणास इंडियन मेडिकल सर्व्हिसच्या परीक्षेस बसावयाचें होतें, परंतु त्याला त्या परिक्षेस बसण्याची मनाई करण्यांत आली त्याचप्रमाणें इंडियन सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा देण्यासाठीं विलायतेंत येऊन राहिलेले रुस्तमजी हिरजी वाडिया यानाही त्या परिक्षेची परवानगी मिळेना. हे मनाईचे ठराव अन्यायाचे असल्यामुळें दादाभाई फार चिडून गेले असल्या अरेरावीच्या गोष्टींचें निर्मूलन करण्यासाठीं कंबर बांधून त्यांनी सर अर्स्किन पेरी यांची गांठ घेतली असला अंधेर नगरींतील कारभार बंद झाला नाहीं तर इंग्रजी राज्याचा पाया डळमळूं लागेल असें त्यांस स्पष्ट सांगितलें, व हा विषय पार्लमेंट

सभेपुढें मांडा अशी त्यांस आग्रहाची विनति केली पेरीसाहेब फार उदार मनाचे होते आणि हिंदुस्थानच्या कल्याणाची त्यांना खरी कळकळ होती पार्लमेंटमध्यें फार वजनदार समजले जाणारे जॉन ब्राइट यांच्याबरोबर या विषयाबद्दल पेरीसाहेबांनीं पुष्कळ चर्चा केली व त्यांचें मन आपल्या बाजूस वळवून घेतलें शिवाय पार्लमेंटच्या दुसऱ्या पुष्कळ सभासदांच्या भेटी घेऊन त्यासही त्यांनी आपल्या मताला अनुकूल करून ठेविलें पेरीसाहेबाच्या मदतीनें दादाभाईंनीं अतिशय परिश्रम करून पार्लमेंटपुढें हा इडियन सर्व्हिसचा प्रश्न यावा व त्याचा निकाल हिंदी लोकाना अनुकूल व्हावा अशी जय्यत तयारी करून ठेविली. आतां हा विषय पार्लमेंटपुढें निघणार असें दादाभाईस खात्रीनें वाटलें. परंतु इतक्यांत—

अमेरिकेमध्यें दक्षिण संस्थानें व उत्तर संस्थानें यांच्यामधील कलहाग्नि भडकून युद्धापर्यंत मजल आली. दक्षिणेकडील संस्थानात गुलामांचा व्यापार फार जोरानें चालत असे. तेथें गुरांप्रमाणें माणसाची खरेदीविक्री होत असून सधन लोक विकत घेतलेल्या गुलामांचा परमावधीचा छळ करीत असत ह्या अमानुष दुष्टपणाची कोणालाही चीड येण्यासारखी होती हा गुलामाचा व्यापार बंद करा म्हणून उत्तरेकडील संस्थानांतील लोकांनीं दक्षिणेंतील व्यापाऱ्यांची नाना प्रकारांनीं विनवणी केली. परंतु जुलूम करण्याची चटक लागलेले व दुष्टपणाची संवय अंगीं मुरलेले ते लोक कांहीं केल्या ऐकेनात. अखेर गुलामांना मुक्त करण्यासाठीं उत्तरेकडील संस्थानांना शस्त्र हातीं घेणें भाग पडलें विलायतेंतील सर्व लोकांचें लक्ष या युद्धाकडे व ह्या गुलामगिरीच्या प्रश्नाकडे गुतल्यामुळें पार्लमेंटपुढें येण्याच्या बेतांत असलेला आय्. सी. एस् चा प्रश्न एकदम मागें पडला.

कामा कंपनीच्या शाखेचें काम करण्यांत चार पांच वर्षें घालविल्यानंतर दादाभाईंनीं ह्या कंपनीचा संबंध तोडून "दादाभाई नवरोजी आणि कंपनी" अशी निराळी स्वतंत्र कंपनी स्थापन केली. कामा कंपनीची

**नवीन कंपनी**

भागीदारी सोडून देऊन दादाभाई वेगळे कां झाले, याचें खरें कारण कोणालाच नक्की माहीत नाहीं. कांहींचा असा तर्क आहे कीं, कामाबंधूंपैकीं एक, मंचरजी होरमसजी कामा, हे पुरातन पार्शी धर्माचे कट्टे अभिमानी असल्यामुळें दादाभाईसारख्या कृतिमान सुधारकाशीं त्यांचें पटेनासें झालें असावें व त्यामुळें दादाभाईंनीं कामा कंपनीचें काम सोडून दिलें असावें.

याच सुमारास म्हणजे सन १८६४ मध्यें दादाभाई हे मुबई युनिव्हर्सिटीचे फेलो निवडले गेले इकडे ही दादाभाईची नवीन कंपनी स्थापन होऊन तीन-चार वर्षें होतात न होतात तोंच वर सागितलेलें अमेरिकन युद्ध सुरू झालें या युद्धाचा इग्रजी व्यापारावर मोठा परिणाम झाला दक्षिणेकडील संस्थानांना लागणारा कापूस ग्रेट ब्रिटनच्या मार्फत पुरविला जाई. हा व्यापार फार मोठ्या प्रमाणावर चालत असून हीं दक्षिणेकडील सस्थानें ग्रेट ब्रिटनचीं कायमचीं गिऱ्हाइकें होतीं परंतु हें युद्ध उत्तरेकडील संस्थानांनीं गुलामांचा व्यापार बद करण्यासाठीं आरभिलें असून त्या कामीं ग्रेट ब्रिटनचेंही मत तसें होतें गुलामगिरीचे आम्ही दुष्मन आहों, आणि जगांतील गुलामांचा व्यापार नामशेष करण्यासाठीं आम्ही आपल्या प्राणांचा व पैशाचा वाटेल तसा होम करण्यास तयार आहों, असें ब्रिटिश मुत्सद्दी वारवार मोठ्या अभिमानानें सांगत असत. त्यामुळें जरी या उत्तर संस्थानांची बाजू घेऊन प्रत्यक्ष लढाईंत पडण्यास ते तयार नव्हते, तरीं आपल्या पूर्वीच्या गिऱ्हाइकाला पूर्वीप्रमाणेंच कापूस पुरवीत राहून अप्रत्यक्षपणें गुलामगिरीलाच उत्तेजन देण्याचें पाप करण्याचें त्याचें धैर्य झालें नाहीं या कारणानें अमेरिकेमध्यें युद्ध जुपल्यापासून इग्रजांचा कापसाचा व्यापार मदावला, आणि बंदरांत पडून राहिलेल्या कापसाच्या गठ्ठयांकडे पहात स्वस्थ राहणें इंग्रजी व्यापाऱ्यांस भाग पडलें एकामागून एक कित्येक कपन्या बुडाल्या हिंदी व्यापाऱ्यां-पैकीं बयरामजी होरमसजी कामा यांनीं प्रथम दिवाळें काढलें दादाभाईंच्या कंपनीची स्थिति उत्तम होती त्यांच्या व्यापाराला इतरांबरोबर मदी आली होती हें खरें, तरी त्याचें दिवाळें वाजेल असें त्याच्या शत्रूसही वाटलें नाहीं. कारण बयरामशेटजीची कपनी बसली ती केवळ या Cotton crisis "कापसाच्या बंदी"मुळें नव्हे, "समुद्र हटवून जागा घेण्याच्या" (Reclamation Scheme) मुबईच्या योजनेंत व दुसऱ्या पुष्कळ बाबींत अमर्याद सट्टे केल्यामुळें बयरामजी गोत्यात आले होते. सट्ट्याचा व्यापार करणाऱ्या लोकांच्या सावलीलाही उभें न राहण्याचा दादाभाईचा निश्चय होता त्यांचें हिशेबाचें काम चोख असे आणि त्यांची सचोटी फार होती, यामुळें त्यांच्या कंपनीला धक्का बसण्याचा मुळींच संभव नव्हता. परंतु दादाभाईंचा फाजील दयाळूपणा आणि भोळेपणा त्यांच्या नुकसानीला नेहमीं आमंत्रण देत असे, त्या प्रमाणेंच या प्रसंगींही त्या सद्गुणानेंच त्यांचा घात केला. तो असाः—

दादाभाईकडे डॉक्टर बरजोरजी कूपर या नांवाचे एक पार्शी गृहस्थ आले. ते दादाभाईंचे मोठेसे स्नेही होते असें मुळींच नाहीं, परंतु संकटांत पडलेल्या शत्रूसाठीं सुद्धा जे दादाभाई वाटेल तें करण्यास तयार, ते आपल्याकडे याचना करण्यास आलेल्या जातभाईला विन्मुख परत कसा लावतील ? हे कूपरशेट विलायतेत येऊन स्वतंत्र व्यापार करीत असत, आणि त्यांनीं व्यापारांत पुष्कळ पैसा कमावला होता परंतु पुढें पुढें त्यांना सट्टे करण्याचें व्यसन लागलें धनलोभास बळी पडून सट्टे करतां करतां त्यांच्या द्रव्यास ओहटी लागली, आणि अखेर दिवाळें निघून अब्रू जाणार अशी त्यांच्यावर पाळी आली या भयंकर संकटाची छाया दिसूं लागल्यामुळें त्यांनीं दादाभाईकडे धांव घेतली आणि आपली सर्व स्थिति निवेदन करून मदत करण्याविषयीं त्यांची करुणा भाकली दादाभाईंचें अंतःकरण द्रवलें बरजोरजी शेटला कर्ज फार आहे, तुम्ही त्याला थारा देऊं नका, तुम्ही मदत कराल तर स्वतःच साफ बुडाल, असें पुष्कळांनीं दादाभाईस सांगितलें, तरी दादाभाई ऐकेनात आपला एक जातभाई पार्शी गृहस्थ या परक्या देशांत अशा संकटांत असतां व त्यानें येऊन तोंड वेंगाडलें असता आपण त्यास मदत न करणें हें शीलास शोभणारें नाहीं, हें धर्मनियमांच्या विरुद्ध आहे, असें दादाभाईंचें म्हणणें पडलें; आणि सर्व लोकांच्या उपदेशाच्या उलट वागून दादाभाईंनीं आपलें वचन खरें केलें बरजोरजी शेटला ते जामीन राहिले, व बरजोरजी अब्रूनिशीं सुटले. बरजोरजी शेटच्या सावकारांनीं आपल्या वह्या दादाभाईपुढें टाकल्या आणि देण्याबद्दल तगादा लावला बरजोरजीला हजारों रुपयांचें देणें निघालें व दादाभाईनीं कांहीं एक कुरकूर न करतां किंवा सूट न मगता तें सर्व कर्ज फेडून टाकलें आणि त्यामुळें दादाभाईंची कंपनी हतत्राण होऊन बुडाली

**कंपनी बुडाली**

तुकारामबुवांनीं मुद्दाम नुकसानीचा व्यापार करून स्वतःस परमार्थासाठीं मोकळें करून घेतलें, त्याचप्रमाणें दादाभाईंनीं जाणून बुजून बुडत्या माणसाची मिठी आपल्या गळ्याभोंवतीं घट्ट बसवून घेऊन व्यापारसागराच्या तळाचा ठाव पाहिला आणि व्यापारी देवघेवींतून स्वतःस सोडवून घेऊन राजकीय चळवळीकडे एकाग्रतेनें मन लावण्याची तयारी केली, असें म्हटलें असतां चालेल कंपनी बुडाल्याबर ब्रिटिश प्रजेचें लक्ष हिंदुस्थानाकडे कसें लागेल याबद्दल ते विचार करूं लागले. राजकीय चळवळ एकट्या दुकट्यानें करून फारसा उपयोग होणार

नाहीं, त्यासाठीं कांहीं तरी संघटित प्रयत्न झाला पाहिजे, काही वजनदार मंडळीं एकत्र जमून एकसारखा ह्या विषयाचा खल करतील आणि विलायतेंतील मुत्सद्दी लोकांच्या मागें लकडा लावतील तरच कांहीं कार्य होईल, असें त्यांस वाटू लागलें सन १८६० सालीं इंडियन सर्व्हिसच्या बाबतींत आपण एकट्यानें प्रयत्न करून पाहिला, त्या वेळींच पांच पन्नास जणांच्या एखाद्या मंडळीमार्फत जर तशी खटपट झाली असती तर कदाचित् जास्त यशाचा वांटा पदरीं पडला असता, असें त्यांच्या ध्यानांत आलें तेव्हां आतां विलंब न लावता या चळवळीसाठीं एक मंडळ स्थापन करावें असें ठरवून हिंदुस्थानच्या लोकाची या कामाला सहानुभूति मिळवावी, आणि देशी संस्थानिकाची कांहीं तरी मदत मागावी, या हेतूनें दादाभाई विलायतेंतून परत हिंदुस्थानात आले त्यानीं मोठ्या पुढाऱ्यांच्या, धनिकाच्या आणि संस्थानाधिपतींच्या गांठी घेतल्या, आपला बेत त्यांस सागितला, आणि संघटित प्रयत्नाचें महत्त्व सर्वांस समजावून दिलें. सर्वांना त्याचा विचार पसंत पडला, मदत करण्याबद्दल सर्वांनीं आश्वसन दिलें. आणि दादाभाईंनीं सन १८६७ सालीं लंडन येथें "ईस्ट इंडिया ॲसोशिएशन" नांवाच्या मंडळाची स्थापना केली

**ईस्ट इंडिया ॲसोसिएशनची स्थापना**

सन १८७९ मध्यें लॉर्ड स्टॅनलेनीं सिव्हिल सर्व्हिसच्या नियमात फेरफार न करण्याचें आश्वासन दिलें होतें, आणि तो प्रश्न पार्लमेंटपुढें येऊन अनुकूल निकाल करून घेण्याची सन १८६० मध्यें तयारी झाली होती, परतु अमेरिकेंतल्या कलहामुळें ते काम तसेंच पडलें हें मागें सागितलेंच आहे परतु मध्यंतरीं या प्रश्नाला निराळ्याच एका कारणानें महत्त्व आलें इंडियन सिव्हिल सर्व्हिसच्या परिक्षेला जे विषय नेमलेले असत त्यात संस्कृत व अरेबिक भाषा होत्या, व हिंदुस्थानातले तरुण बहुतकरून त्या घेत, या परिक्षेसाठीं एकंदर दहा हजार मार्कांच्या कोणत्याही विषयांचा अभ्यास करावयाची परवानगी असल्यामुळें या भाषांचे मार्क जितके अधिक तितकी हिंदी लोकांस परीक्षा सोपी पडे. परतु आतां या भाषाचे मार्कच कमी करण्याचें अधिकाऱ्यांनीं ठरविलें. त्यामुळें हिंदी तरुणांचें नुकसान होणार होतें. I. C S. परिक्षेंत हा फेरफार न व्हावा म्हणून दादाभाईंनीं चळवळ सुरू केली. सन १८६५ मध्यें या प्रश्नाला रंग आला व दादाभाईंनीं स्टेट सेक्रेटरीपर्यंत वाद पोहोंचविला. या दोन्ही भाषांत ज्ञानसंग्रह मोठा आहे,

त्यांच्यासाठीं नेमलेले मार्क कमी केल्यास त्या भाषांच्या अभ्यासाकडे उमेदवार लोकांचें मन लागणार नाहीं, असल्या कमीपणामुळें या भाषाच्या सस्कृतींचा एक प्रकारानें अपमान केल्यासारखें होणार आहे, आणि परभाषेंत होणारी परीक्षा, इतर दुसऱ्या अनेक भाषा शिकण्याची मेहनत वगैरे ज्या कित्येक गोष्टी त्या परिक्षेस बसू पाहणाऱ्या हिंदी उमेदवारांना अडचणीच्या पेचानें आधींच दडपू पाहत आहेत त्यांत ही भर घातल्यासारखें होणार आहे, वगैरे स्थिति दादाभाईंनीं स्टेट सेक्रेटरीसाहेबाना नीटपणें समजावून सागितली. त्यामुळें स्टेट सेक्रेटरींची खात्री पटली, आणि सस्कृत व अरेबिक भाषाचे मार्क पूर्वीप्रमाणेंच कायम राहिले

हे असले किरकोळ प्रश्न भाडणास निघण्याचा सभव न राहील असा काहीं तरी या सिव्हिल सर्व्हिसबद्दलचा निकाल करून घेतला पाहिजे, असें दादाभाईंस वाटूं लागलें. या आय् सी. एस्.च्या परिक्षेच्या बाबतींत गोऱ्या व काळ्या उमेदवारामध्यें जो अन्यायमूलक भेद ठेवलेला आहे, त्या कारणानें हे बारकेसारके वाद पुनःपुन्हा उपस्थित होतात तेव्हा या मूलभूत रोगाचें निर्मूलन केल्याशिवाय हे मधले झटके निस्तरीत बसण्यात अर्थ नाहीं, अशा विचारानें अनेक निबध लिहून, व्याख्यानें देऊन, पत्रव्यवहार चालू ठेवून आपली बाजू पुढें माडण्याचा उद्योग दादाभाईंनीं सुरू केला. शुक्रवार, ता. १७ एप्रिल सन १८६८ रोजीं ईस्ट इडिया ॲसोशिएशनच्या सभेंत "सुशिक्षित हिंदी लोकाचा सिव्हिल सर्व्हिसमध्यें प्रवेश" या विषयावर त्यानीं एक निबध वाचला. त्या वेळीं (E. B Eastwick Esq, C B F R S) ईस्टविकसाहेब अध्यक्ष होते. तो सबध निबध इग्रजीमध्यें नटेसन यांच्या पुस्तकांत (पान ४९४—५३४) येथें छापलेला आहे. त्याचा साराश असाः—

"हिंदी लोकाना सिव्हिलिअन्स करण्याविरुद्ध अनेक आक्षेप घेण्यात येतात. परंतु या आक्षेपकानीं हें लक्षात ठेवलें पाहिजे कीं, हिंदी तरुणाविरुद्ध काय आक्षेप घेता येतील हा सध्याचा प्रश्न नसून सन १८३४ सालीं पास झालेल्या पार्लमेंटच्या कायद्यातील अभिवचनें, व या अभिवचनाची पुनरुक्ति करणाऱ्या १८५८ सालच्या राणीच्या जाहीरनाम्यांतील आश्वासनें न्यायानें व प्रामाणिकपणानें पूर्ण करण्यात येणार आहेत, कीं त्या आश्वासनाची केवळ थट्टा करण्याचा इंग्लिश लोकांचा उद्देश आहे हा मुख्य प्रश्न आहे. वचनें दिलीं आहेत—तीं

यावीं किंवा नाहीं, याविषयींच्या चर्चेला आता जागा नाहीं. तीं आतां पाळणार कीं फोल ठरविणार हें इंग्लिश लोकांनीं स्पष्ट सांगावें. पार्लमेंटनें पास केलेल्या कायद्याची अंमलबजावणी कशी करावी त्याविषयीं सूचना-उपसूचना करण्याची ही वेळ आहे एक प्रश्न असा कीं, सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा इग्लंडमध्यें व हिंदुस्थानांत एकाच वेळीं घेतां येणें व्यवहार्य आहे किंवा नाहीं. यासंबंधीं मी दोन सूचना करतों. इग्लिश व हिंदी विद्यार्थ्यांस एकाच परीक्षेस बसवावें हें जरूर वाटत असेल तर इग्लंडहून हिंदुस्थानांत परिक्षेचे पेपर पाठवावे, किंवा हिंदुस्थानांतील परिक्षेची व्यवस्था इंडिया गव्हर्मेंटकडे सर्वस्वीं सोंपवावी म्हणजे पेपर पाठविण्याचा खटाटोप नको हिंदुस्थानात विद्वान् व उत्तम परीक्षक खात्रीनें मिळतील. कोणी म्हणतात कीं, नेटिव लोक बुद्धीनें व शारीरिक सामर्थ्यानें कमी आहेत व त्याच्यात प्रामाणिकपणा कमी आहे, परतु हें म्हणणें अत्यंत अज्ञानाचें व खोडसाळपणाचें आहे आमच्यांतील पुरातन साहित्याच्या तोडीचें साहित्य आजपर्यंत कोणत्याही देशांत निर्माण झालेलें नाहीं पुरातन मोठेपणाची बढाई मारण्याच्या पोकळ अभिमानावर मी सतुष्ट आहें असें नव्हे. अगदीं अलीकडे युनिव्हर्सिटी स्थापन झाल्यापासून जे पदवीधर बाहेर पडले त्याच्याही अगची कुशाग्रबुद्धि व शारीरिक मेहनतीची आवड सर्वांस दिसून आली आहे शिवाय सरसकट वाटेल त्या हिंदी माणसाला अधिकाराची जागा द्या, असें आम्ही थोडेंच म्हणत आहों ? जे लायक ठरतील त्यांस आडकाठी करू नका येवढेंच आमचें मागणें

हिंदी पदवीधराची दानत समाधानकारक नसते, असें काहीं आक्षेपक म्हणतात परतु असा आक्षेप खरा ठरल्यास ज्या इग्रजी साहित्याचा व शास्त्रांचा या पदवीधरांना वर्षानुवर्षे अभ्यास करावा लागतो, त्या साहित्याची व शास्त्रांची किंमत कवडीमोल ठरणार नाहीं काय ?

हिंदी लोकांच्या प्रामाणिकपणाविषयीं शका प्रदर्शित करणाऱ्या गोऱ्या लोकांनीं हें खूप ध्यानांत ठेवावें कीं, अप्रामाणिकपणाचीं ढोबळ उदाहरणें इंग्रज लोकांत वाटेल तेवढीं सांपडतील. क्लैवसारखे इंग्रज हिंदुस्थानात असतांना औट घटकेंत श्रीमंत नबाब बनले ते कसे ? मिल्लनें तर असें लिहिलें आहे कीं, "कंपनीच्या सर्व्हंटांची त्या वेळची वर्तणूक म्हणजे अधिकारानें उन्मत्त झालेल्या निर्लज्ज अन्यायीपणाचें अगदीं बिनतोड उदाहरण होय." फार कशाला, या लंडन

शहरांत गोरे खाटीक व व्यापारी खोटीं वजनें वापरणें, मालांत भेसळ करणें वगैरे निंद्य लबाड्या केवळ्या तरी मोठ्या प्रमाणात करतात हें सर्वांस महशूर आहेच

हिंदी लोकाच्या अगीं अधिकाराची पात्रता कितपत आहे याविषयीं हिंदुस्थानांत कारभार करून परत आलेल्या युरोपिअन माणसाचीं मतें मागविलीं होतीं लॉर्ड हॅरिस, Sir C Trevelyan, General Briggs Edward Maltby, Sir A Grant, कित्येक प्रोफेसर व प्रिन्सिपॉल या सर्वांनीं हिंदी तरुणाच्या बुद्धिमत्तेविषयीं व कर्तव्यतत्परतेविषयीं आपली खात्री प्रदर्शित केली आहे हिंदी तरुणांच्या शारीरिक सामर्थ्याबद्दल सदेह असेल तर त्याची त्या बाबतींत परीक्षा घ्या. आणि कांहीं झालें तरी हिंदुस्थानातील इंग्रजी राज्य ज्या नेटिव लोकाच्या शौर्याच्या जोरावर उभारलें गेलें, ते नेटिव लोक शरीरबलाच्या बाबतींत दरिद्री खास नाहींत.

कोणी म्हणतात, हिंदी लोक मोठे अधिकारी झाले तर युरोपिअन लोकाना त्यांच्या हाताखालीं काम करावें लागेल, व हें त्याना रुचणार नाहीं परतु असें म्हणणें म्हणजे ब्रिटिश ब्रीदाला हरताळ फासण्यासारखें आहे योग्यता दिसली, कीं तिच्यापुढें जातिभेद विसरून जाऊन प्रत्येक ब्रिटिशानें मान वाकविलीच पाहिजे, नाहींतर ब्रिटिश गुणग्राहकता ती काय ?

नेटिव अधिकारी असला कीं, त्याचे देशबाधव त्याचा मत्सरयुक्त अवमान करतात, असा आक्षेप घेण्यांत येतो परतु ही गोष्ट साफ खोटी आहे रा० माधवराव रानडे, एल्फिन्स्टन कॉलेजांत प्रोफेसर झाले त्या वेळीं सर्व लोकानीं आपला अत्यानंद प्रदर्शित केला मला प्रोफेसरची जागा मिळाली तेव्हांसुद्धां माझा सर्वांनीं अपूर्व सन्मान केला जस्टिस शभुनाथ पंडित वारले तेव्हां ती बातमी गव्हर्नर जनरलला कळवितांना चीफ जस्टिसनीं असें लिहिलें आहे कीं, " जस्टिस शभुनाथ पडित अत्यंत सद्गुणी व कार्यक्षम होते, आणि त्यांच्या देशबांधवांचा त्यांच्यावर अपार विश्वास व लोभ होता "

कोणी म्हणतात, नेटिव लोक सरकारी चाकरीमागें फार लागतात व त्याच्यात स्वतंत्र धंदा करण्याचा बाणा बिलकुल दिसून येत नाहीं परतु आपल्या देशाचा कारभार आपल्या हातीं असावा असें इंग्रज लोकाप्रमाणेंच आम्हांलाही वाटलें तर त्यांत अप्रशस्त किंवा निसर्गविरुद्ध तें काय झालें ? शिवाय, आज कित्येक

र्षे गुजराथी लोक धाडशी व्यापारी म्हणून प्रसिद्ध आहेत व कित्येक तरुणांनीं कायदा, वैद्यकी वगैरे स्वतंत्र धंद्यांत प्रवेश केला आहे बरें, स्वतंत्र धंदा काढण्याची ताकद अंगीं उत्पन्न होण्यासारखें शिक्षण हिंदी विद्यार्थ्यांस मिळावें म्हणून शिष्यवृत्ति ठेवण्यासाठीं मुंबईच्या काहीं दानशूर धनिकानीं दोन तीन लाख रुपये गोळा केले व त्या फंडांत भर घालण्याची सरकारला विनति केली मग ही विनंति नाकबूल करण्याचें धोरण सरकारनें कां पत्करलें ? आणि सरकारी नोकरीची हिंदी लोकांना फार आवड आहे म्हणून त्यांची तेथून हकालपट्टी करावी हें कोठलें शास्त्र ?

पुष्कळ नेटिव लोकाना सरकारी नोकऱ्या आहेत असें आमच्या मागणीला केव्हां केव्हा उत्तर मिळतें. परंतु हें उत्तर हातचलाखीचे आहे कसें तें पहा. बेनकरारी नोकरवर्गामध्यें (Uncovenanted Services) ३।४ हजार रुपये पगार खाणारे सुमारें ८५० युरोपिअन व ॲंग्लोइंडियन आहेत उलटपक्षीं ६८० किंवा जास्त रुपये मिळविणारे अवघे ६०० एतद्देशीय नोकर असून त्याच्यापैकीं जवळ जवळ ३५० लोकाना ६०० रुपयाच्या आतच खितपत ठेवलें आहे १६०० रुपये पगार मिळविणारे नेटिव तर हाताच्या बोटांवर मोजले तर सगळ्या बोटांचा उपयोगच करावा लागणार नाहीं. अशी स्थिति असतां तुम्हांला पुष्कळ नोकऱ्या आहेत असें आम्हांस सांगणें म्हणजे दुष्टपणानें दुःखावर डागण्या देण्यासारखें आहे.

पार्लमेंटच्या कायद्यात व राणीच्या जाहीरनाम्यात जीं अभिवचनें दिलीं आहेत तीं मनापासून दिलेलीं आहेत याविषयीं मला बिलकुल शंका नाहीं. आणि त्या वचनांची पूर्तता करावयाची असेल तर हिंदुस्थानात I. C S. ची परीक्षा घेऊन सर्व प्रजाजनास समतेनें वागविल्याचें प्रत्यक्ष दाखविल्याशिवाय गत्यंतर नाहीं."

हा निबंध स्टेट सेक्रेटरीकडे पाठविण्यांत आला.

याच विषयावर दुसरा एक निबंध सन १८६४ साली मे महिन्याच्या २ ऱ्या तारखेस दादाभाईनीं नॉर्थकोट (Sir Stafford Northcote) साहेबांकडे पाठविला आय सी. एस्, परिक्षेसंबंधानें ता० २३ एप्रिल रोजीं कॉमन्स सभेंत (House of Commons) फॉसेटसाहेबानीं ठराव आणल्या वेळीं नॉर्थकोटसाहेबांनीं घेतलेले कित्येक आक्षेप या निबंधांत खोडून काढले होते. हिंदी

लोकांच्या कर्तबगारीसंबंधानें सर सालरजंग, सर दिनकरराव, सर माधवराव इत्यादि उदाहरणें पुढें माडली होतीं, आणि जुन्या राज्यकारभार केलेल्या घराण्यांतील लोकांना पुढें आणून त्यांच्यांत ब्रिटिश अमलाविषयी आवड उत्पन्न करण्याचा उपाय सुचविला होता

याच सुमारास दादाभाईंनीं आपल्या मुलाला (आर्देशीरला) विलायतेस विद्याभ्यासासाठीं आणिलें, आणि म्हैसूर संस्थान खालसा केलें होतें, तें परत मूळच्या राजघराण्याकडे चालविण्यासाठीं खटपट करण्यास आलेल्या बेलसाहेबांस (Major Evans Bell) दादाभाईंनीं अनेक प्रकारांनीं मदत केली

*

प्रकरण पांचवें

# व्याख्यानांची मोहीम–ईस्ट इंडिया ॲसोसिएशनची शाखा–दिवाणगिरी

सन १८६९ सालीं दादाभाई मुबईस परत आले विलायतेंत गेल्यावर त्यांनीं व्यापारात मिळविलेलें नाव, निरनिराळ्या संस्थांमध्यें कामगिरी करून दाखविलेलें बुद्धिवैभव, सिव्हिल सर्व्हिसच्या बाबतींत केलेली खटपट, वाडिया व कोला या दोन पार्शी तरुणाच्या बाबतींत घेतलेले अविश्रांत श्रम, स्टेट सेक्रेटरी वगैरे बड्या मुत्सद्दयानीं त्याच्यासबधानें काढलेले स्तुतिपर उद्गार, ईस्ट इडिया ॲसोसिएशन स्थापन करण्यात दादाभाईनीं दाखविलेली मुत्सद्देगिरी व स्वदेशप्रीति–या सर्व गोष्टींकडे हिंदुस्थानांतील लोक सन १८५५ पासून आज चवदा वर्षें सकौतुक दृष्टीनें पहात होते. हिंदुस्थानावर ब्रिटिश अंमल सुरू झाल्यापासून आजपर्यंत एकानेंही राजकीय चळवळीचें लोण स्टेट सेक्रेटरीपर्यंत पोहोंचविलें नव्हतें, आणि हिंदी लोकाच्या हक्कांसंबधानें भाडताना ब्रिटिश लोकाच्या पदरीं दोषाचें माप घालण्याचें काम दादाभाईनींच प्रथम केलें त्यामुळें हिंदुस्थानच्या लोकांच्या आश्चर्यचकित दृष्टीला दादाभाईचा थोरपणा अधिकच मोठा दिसूं लागला दादाभाई मुंबईस येतांच मुबईच्या रहिवाशानीं एक जगी सभा भरवून त्यांस मानपत्र व थैली अर्पण केली ते सर्व पैसे दादाभाईनीं ईस्ट इडिया ॲसोसिएशनच्या कामाला देऊन टाकले

इकडे आल्यावर ठिकठिकाणीं व्याख्यानें देण्याची मोहीम त्यानीं सुरू केली आपल्या हक्काची हिंदी प्रजेला जाणीव नसल्यामुळें अधिकाऱ्यांची दडपशाही चालूं शकते अशी दादाभाईस खात्री वाटत होती, आणि हिंदी लोकांनीं सनदशीर चळवळ करून ब्रिटिश पार्लमेंटपर्यंत आपलें गाऱ्हाणे पोहोंचविल्यास त्या कामीं यश मिळण्याइतकी न्यायप्रीति व समता इंग्रजी मुत्सद्दयांत आहे याविषयीं त्यांस बिलकुल सशय वाटत नव्हता. म्हणून हिंदुस्थानभर फिरून लोकांमध्यें जागृति उत्पन्न करण्याच्या कामगिरीस त्यांनीं आरंभ केला. हा व्याख्यानांचा ओघ देशी संस्थानांकडेसुद्धां फिरवावयाचा अशी त्यांची इच्छा होती. त्या वेळ-

-च्या इतर पुढाऱ्यास, म्हणजे भाऊ दाजी, तेलग वगैरे मंडळीला देशी संस्थानांचें महत्त्व वाटत नव्हतें सस्थानिकांकडे ते तुच्छतेनें पहात, आपल्या राजकीय चळवळींत व आकांक्षेंत त्यांचा कोणताही भाग असणे इष्ट व रीतसर नाहीं, असें त्यांचें मत पडे, लाडानें फाजील बनलेल्या श्रीमंताच्या मुलाकडे ज्याप्रमाणें इतर लोक पाहतात व त्यांस निरुपयोगी ठरवितात, त्याप्रमाणेंच देशी संस्थानिकांची कांहींच किमत नाहीं असें त्या पुढाऱ्यांस वाटत असे दादाभाईंना ही विचारसरणी रुचत नसे सस्थानिकाना आपल्या राजकीय हितसबधात भागीदार न करण्यानें एक बहुमोल शक्ति अविचारानें गजू दिल्यासारखें होईल, असें दादाभाईंचें मत होतें विद्वान् पुढाऱ्यानीं आपली मुत्सद्देगिरी संस्थानिकाच्या दिमतीस दिली पाहिजे, आणि सस्थानिकांनीं आपल्या खजिन्याचा विनियोग ब्रिटिश मुलखातील पुढाऱ्यानीं हातीं घेतलेल्या कार्याकडे केला पाहिजे, म्हणजे पूर्ण एकोपा होऊन हिंदुस्थान हें एकजीव राष्ट्र होईल, व अशा सबळ राष्ट्रानें केलेल्या मागणीला विलक्षण महत्त्वाचें सामर्थ्य येईल, असा त्याना भरंवसा वाटत होता याच विश्वासाच्या जोरावर त्यानीं आपल्या आयुष्यात अनेक सस्थानिकांना निरपेक्ष मदत केली, व सन १८६९ मध्यें सुरू केलेली व्याख्यानमालेची मोहीम संस्थानांतूनसुद्धां यशस्वी करण्याचें त्यानीं ठरविलें, तें तरी याच विश्वासानें निरनिराळ्या सस्थानात दादाभाईंचीं जीं व्याख्यानें झालीं, त्यांत एक विशेष महत्त्वाचें होतें गोंडळ येथें ते गेले तेव्हा तेथील ठाकूरसाहेबांना आपल्या प्रजाजनांची एक मोठी जाहीरसभा बोलावली व तिच्यापुढें "हिंदुस्थानची सद्यःस्थिति" या विषयावर दादाभाईंचें गुजराथी भाषेंत मोठें भाषण झालें हें व्याख्यान फारच चागलें झालें, व ठाकूरसाहेबानीं आणि त्याच्या प्रजाजनानीं दादाभाईस फार मदत केली. त्या व्याख्यानाइतकें सुदर व सुरस व्याख्यान आपणास पुन्हा ऐकावयास मिळालें नाहीं असें गोंडळ सस्थानांतील वृद्ध माणसें आपल्या मुलांबाळांस सागत असतात.

**संस्थानांविषयीं मतें**

ह्या व्याख्यानांपासून लोकामध्यें पुष्कळ जागृति उत्पन्न झाली आहे खरी, परंतु आपली पाठ फिरल्यानतर त्यांचा परिणाम फार दिवस टिकणार नाहीं, पाण्यावर ओढलेल्या रेषेप्रमाणें तो अस्थिर आहे, हें दादाभाई जाणून होते, यासाठीं एखादी कायमची संस्था स्थापावी म्हणजे देशभक्तीची लाट कायम

टिकेल; सामान्य जनसमूह थंडच असतो, अज्ञानामुळें काय करावें हें त्यांना कळत नाहीं, आणि उच्च सुखाचें ध्येय पुढें नसल्यानें आहे तें कमी मानण्याकडे त्यांची प्रवृत्ति असत नाहीं; म्हणून साधारण लोकांना वारवार जागृत करण्यासाठीं एखाद्या संस्थेची फार आवश्यकता आहे, असें त्याना वाटूं लागलें. या विचारानें मुंबईसारख्या मध्यवर्ती शहरांत राजकीय विषयाची चर्चा अव्याहत चालू ठेवणारें एक मंडळ काढण्याचा दादाभाईनीं बेत केला व आपल्या हेतूस सर्व पुढाऱ्यांची सहानुभूति मिळविली एखादी अगदींच नवी संस्था काढण्यापेक्षां विलायतेंत आपण आधींच स्थापन केलेल्या ईस्ट इंडिया ॲसोसिएशनची एक शाखा मुंबईस काढलेली बरें, म्हणजे दोन्ही देशांतील राजकीय चळवळींचा एकजीव होऊन ह्या संस्था चालविणाऱ्या मंडळीचें परस्परांस चांगलें साहाय्य मिळेल, अशा विचारानें सन १८६९ सालीं दादाभाईनीं मुंबईस ईस्ट इंडिया ॲसोसिएशनची शाखा सुरू केली.

ही शाखा स्थापन झाल्यावर दादाभाई पुन्हा विलायतेस गेले सन १८६७ मध्यें दादाभाईची कंपनी बुडाल्यापासून दादाभाईची व्यापारविषयक खटपट बंद पडली होती त्यामुळें त्याना या वेळीं स्वस्थता होती व अमुक एक राजकीय बाबींचा प्रश्न हातीं घ्यावयाचा असाही त्यांचा कांहीं बेत नव्हता तथापि, “जो लोककल्याण साधावया जाण, घेई करीं प्राण” असा कोणी पुढारी निघण्याचा अवकाश, कीं त्याच्यापुढें घडोघडी अनपेक्षित कामें उद्भूत होत असतात सन १८७० मध्यें कच्छच्या महारावाचें व त्याच्या जमीनदारांचें भांडण सुरू झालें. जमीनदार म्हणत कीं, आम्ही महारावांचे ताबेदार नोकर नाहीं, आम्ही अगदीं स्वतंत्र, आमचे आम्ही मालक आहों महाराज म्हणत कीं, जमिनीचे मालक आम्ही आहों, व जमीनदार हे आमच्या हुकुमानें बांधलेले आहेत.

**कच्छच्या महारावांचें काम.**

प्रांतिकसरकारनें जमीनदारांचा पक्ष उचलून धरला आणि त्यामुळें हा तंटा वरिष्ठ सरकारकडे आला. आपली बाजू बिनतोड पुढें मांडली जावी अशी महारावांची साहजिक इच्छा होती ईस्ट इंडिया ॲसोसिएशनच्या कामासाठीं दादाभाईनीं हिंदुस्थानांतल्या राजेरजवाड्यांची व संस्थानिकांची भेट घेतली होती. तेव्हां त्यांची व कच्छच्या महारावांची ओळख झाली होती. आपल्या तंट्याच्या कामांत आपल्या न्याय्य पक्षाचें उत्कृष्ट समर्थन करण्याच्या कामीं दादाभाईची मदत बहुमोल होईल असें

महारावांच्या मनात आलें त्यांनीं आपले दिवाण काजी शाबुद्दिन यांस विलायतेस पाठविलें आणि त्यांस दादाभाईंच्या सल्ल्यानें आपला दावा तयार करण्यास सांगितलें

दादाभाईंच्या समतीनें महारावांच्या बाजूचीं साधक प्रमाणें तयार करीत असतां साहजिकपणेंच दादाभाईंचा व काजीसाहेबांचा बराच स्नेह जमला एके दिवशीं बोलतां बोलतां दादाभाईंची कपनी बुडाल्याच्या गोष्टी निघाल्या तेव्हां अखेर शाबुद्दिन यांनीं विचारलें कीं, "तुम्ही पुन्हा कपनी कां काढीत नाहीं ?"

"नाहीं काढीत झालें !" असें दादाभाईंनीं टाळाटाळीचें उत्तर दिलें

"म्हणजे काय ? तुम्हाला व्यापाराची आवड व हौस आहे ना ? आणि कपनीला पुष्कळ फायदा होत होता ना ?" शाबुद्दिनानीं पुन्हा पकडीनें विचारलें

"होय, मला व्यापाराची हौस आहे, आणि मागें किफायतही पुष्कळ होत असे पण "

"पण काय ?"

"पण भांडवल नाहीं, त्यावांचून सगळें अडतें"

हें संभाषण शाबुद्दीन यांनीं महारावास कळविलें जरूर तें भांडवल व्याजानें पुरविण्याचें महारावांनीं तत्काळ कबूल केलें आणि दादाभाईंची कपनी पुन्हा सुरू झाली या वेळीं दादाभाईंनीं कपनींत दुसरे कोन भागीदार घेतले होते

**हिंदुस्थानचा पैसा**

हिंदुस्थानांतून विलायतेला जाणाऱ्या पैशाच्या व्यवहारासबंधानें कांहीं तरी चांगली व्यवस्था पाहिजे, त्यामध्यें सुधारणा व्हावयास पाहिजे, असें दादाभाईंना वाटू लागलें होतें तेव्हां या विषयावर त्यांनीं अनेक हिंदी पुढाऱ्यांबरोबर व इंग्रज अधिकाऱ्यांच्या जवळ पुष्कळ ऊहापोह करून ठरविलें कीं, यासंबंधीं चौकशी करण्यासाठीं पार्लमेंटकडे विनंति करावी त्याप्रमाणें ईस्ट इंडिया ॲसोसिएशनतर्फे एक अर्ज तयार करून तो पार्लमेंटपुढें सादर करण्यांत आला तो मान्य होऊन सन १८७३ मध्यें हिंदुस्थानचा जमाखर्च (East India Finance) याबाबद चौकशी करण्यासाठीं एक निवडक मंडळी (Select Committee) नेमण्यांत आली. या कमिटीपुढें आपलें मत मांडण्यासाठीं दादाभाईंनीं एक लेख पाठविला तो नटेसनचें. पुस्तक–परिशिष्ट 'ब'–येथें दिला आहे. "हिंदुस्थान अगदीं दरिद्री होत चालला आहे, त्यातील बऱ्याच लोकांना

पोटभर भाजीभाकरही मिळत नाहीं, तेव्हा तेथील पैसा बाहेर जाऊं दिल्यास फार मोठी आपत्ति ओढवणार आहे. याला उपाय म्हणजे जमिनीची सुपीकता वाढविली पाहिजे, व्यवस्थेच्या खर्चाचा भाग विलायतच्या तिजोरींतून दिला पाहिजे, तेथील कायदे लोकाच्या मतानें होतील अशा प्रकारें हिंदी लोकांना राज्यकारभारांत घेतलें पाहिजे, कराच्या ओझ्याच्या वांटणीची पद्धत सुधारली पाहिजे आणि अमर्याद खर्चाला आळा घालून देशाचें सांपत्तिक सामर्थ्य वाढविलें पाहिजे," वगैरे गोष्टी सुचवून दादाभाईनीं या लेखांत असा इषारा दिला होता कीं, " कमिटीपुढें साक्षीला येणारे हिंदुस्थानातील अधिकारी खुशाल सांगतील कीं, 'राज्याची व्यवस्था उत्तम आहे' तर त्याला कमिटीनें भुलून न जातां पुरी चौकशी करून मग आपला रिपोर्ट करावा "

सन १८७२मध्यें लॉर्ड नॉर्थब्रुक यांनीं मुंबईस दरबार भरविला या दरबारास बडोद्याचे महाराजे मल्हारराव गायकवाड यास बोलावणें असूनही त्यांनीं हजर राहण्याचें नाकारलें याबद्दल अधिकारी लोकानीं मोठा ओरडा केला मल्हार-रावांनीं स्पष्ट सांगितलें कीं, दरबारांत व्हाइसरॉयांच्या उजव्या हाताला व सारख्याच उंचीवर जर मला आसन दिलें तरच मी दरबारास हजर राहीन, त्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही जागेवर बसण्यास मी तयार नाहीं. मी मागत असलेली जागा मला हक्कानें प्राप्त होत आहे, कारण पूर्वी खंडेराव गायकवाडांस ती सरकारकडून मिळाली होती ब्रिटिश सरकारनें असा मुद्दा काढला कीं, हिंदुस्थानचें राज्य कंपनीच्या हातून राणी-सरकारच्या ताब्यात गेल्यापासून व्हाइसरॉयचा अधिकार वाढलेला आहे पूर्वी व्हाइसरॉय हा नुसता गव्हर्नर जनरल होता. परंतु आतां त्याचा दर्जा अधिक सन्मानाचा झालेला आहे शेवटीं हा वाद विकोपास जाऊन मल्हारराव दरबारला हजर राहिले नाहींत, व आपण आजारी आहों अशी सबब त्यांनीं पुढें केली. येवढेंच नव्हे, तर हें भांडण स्टेट सेक्रेटरीपर्यंत न्यावयाचें त्यांनीं ठरविलें हिंदुस्थानाच्या लोकांच्या अधिकारांचें सरंक्षण करणारे म्हणून दादाभाईची कीर्ति मल्हाररावांच्या कानीं गेली होती, व या बाबतींत आपल्याला मदत करण्यास जर कोणी सर्वांत लायख मनुष्य असेल तर ते दादाभाई हें जाणून त्यांस मल्हाररावांनीं पाचारण केलें. या वेळीं इतर दोघां भागीदारांच्या साहाय्यानें व्यापार चालविण्यांत दादा-

**मल्हारराव गायकवाडांशीं संबंध**

भाई इंग्लंडमध्यें मग्न होऊन गेले होते परंतु मल्हाररावांचें आमंत्रण येतांच कंपनीचा व्यवहार भागीदारांच्या हवालीं करून दादाभाई तावडतोब हिंदुस्थानांत परत आले मल्हाररावांच्या अधिकारासबंधीं उत्पन्न झालेल्या लढ्याचा त्यांनीं पूर्ण अभ्यास केला, व मोठ्या काळजीपूर्वक मल्हाररावाच्या नांवें एक अर्ज तयार करून तो स्टेट सेक्रेटरींना सादर केला त्या अर्जाचा विचार होऊन असा निकाल देण्यांत आला कीं, मल्हाररावाच्या हयातींत ते मागत असलेलें आसन त्यांस देण्यात येईल, परंतु त्याच्या पश्चात् गादीवर येणाऱ्या गायकवाडांस तो जागा मिळणार नाहीं

दादाभाईंनीं हा विजय मिळवून दिल्याबद्दल मल्हाररावांनीं त्यांस ५०००० रुपये बक्षिसादाखल दिले दादाभाईंनीं हे पैसे तात्काळ धर्मार्थ खर्च केले असते परंतु, लोकांस पैसे वाटेल तसे देऊन टाकण्याची दादाभाईंची खोड त्यांच्या मित्रांस माहीत होती, व हे ५०००० रुपये जर गेले तर दादाभाईंच्या मुलांस भिक्षा मागण्याची पाळी येईल अशी भीति वाटून सोराबजी बंगाली, नौरोजी फर्दुनजी या मंडळींनीं ते रुपये आपल्या ताब्यांत घेऊन दादाभाईंस त्यांचें व्याज द्यावयाचें व त्यांच्या मृत्यूनंतर ते त्यांच्या कुटुंबास द्यावयाचे असें ठरविलें या नंतर दादाभाई इग्लंडास गेले

या गायकवाड प्रकरणानंतर कर्नल फेअर यास रेसिडेंट म्हणून बडोद्यास पाठविण्यांत आलें शिवाय, सरकारनें बडोद्याच्या कारभाराची चौकशी करण्याकरितां नामदार रेंव्हन्सक्रॉफट यांच्या अध्यक्षत्वाखालीं एक कमिशन नेमलें व कमिशनची चौकशीही सुरू झाली. यामुळें मल्हारराव घाबरून गेले व आपले दिवाण होण्याविषयीं त्यांनीं दादाभाईस निकडीचें आमंत्रण पाठविलें दादाभाईंनीं यत्किंचितही आढेवेढे न घेतां एकदम रुकार दिला, फर्मची व्यवस्था भागीदारांकडे सोंपविली, व तावडतोब हिंदुस्थानांत येऊन मल्हाररावास आपण आल्याची वर्दी दिली. त्यांची व महाराजांची प्रथम भेट झाली त्या वेळीं दादाभाईंनीं जे उद्गार काढले ते अत्यंत महत्त्वाचे व त्यांच्या उदार अंतःकरणाचे व निस्पृहतेचे निदर्शक आहेत आपल्याला पगार काय मिळणार वगैरे पैशाच्या बाबतीसंबंधीं चकारसुद्धां न बोलतां दादाभाई म्हणाले, "महाराज, मी तुमची नोकरी द्रव्यासाठीं किंवा कीर्तीसाठीं पत्करीत नाहीं, तुमची राज्यव्यवस्था सुधारण्यासाठीं मी तुमच्याकडे येत आहें. अर्थात् माझ्या अंतःकरणात सदैव वास्तव्य

करणारीं जीं कांही उच्च तत्त्वें आहेत त्याप्रमाणें मी कारभार चालवीन. माझें तुमचें जोंपर्यंत पटेल तोंपर्यंत मी तुमच्या सेवेला हजर आहें आपलें जुळेनासें झाल्याबरोबर एक क्षणभरही बडोद्यांत मी राहणार नाहीं. तुमची शेवटची भेट-सुद्धां न घेतां मी तडक स्टेशनची वाट धरीन."

दादाभाईनीं बडोद्याचा कारभार हातीं घेतला तेव्हां तेथील परिस्थिति अत्यंत गुंतागुंतीची व बिकट होती मल्हाररावाच्या पूर्वी खंडेराव गायकवाड गादीवर असतांना त्या दोघांचा अगदीं उघड उघड उभा दावा असे त्यामुळें मल्हारराव गादीचे मालक झाल्यापासून पूर्वी खंडेरावाच्या कक्षेंत वावरणाऱ्या दरबारी मंडळींचें धाबें दणाणलें मल्हाररावानींही त्यास अमर्यादित निष्ठुरतेनें वागविण्यास सुरुवात केली. याचा परिणाम असा झाला कीं, दादाभाई बडोद्यास आले तों दोन्ही पक्ष उघड वैरभावानें राज्यांत नांदत आहेत असें त्यास आढळून आलें. बडोद्याच्या बाहेर लष्कर म्हणून जो भाग होता, त्यावर बडोदेंसरकारचा अधिकार चालत नसे. त्या भागांत खंडेरावाच्या पक्षाचे लोक जाऊन राहिले होते, व त्यांनीं त्या वेळचा रेसिडेंट कर्नल फेअर याचे कान भारण्याचा उपक्रम सुरू केला होता. फेअर यास दादाभाईची कीर्ति माहीत होती, परंतु मल्हाररावासारख्या दुर्गुणी माणसाची नोकरी करण्यास दादाभाई कसे तयार झाले याचें कोडें त्यास उलगडेना, व पुष्कळ विचाराअतीं त्यानें ठरविलें कीं, केवळ पैशाच्या लोभानें दादाभाई बडोद्यास आले असावेत व्यवहारज्ञानशून्यतेमुळें हा सिद्धान्त फेअरच्या मनांत प्रस्थापित झाला व त्यामुळें कसेंही करून दादाभाईस हाणून पाडावयाचें अशा धोरणानें फेअरनें वागण्यास प्रारंभ केला. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे दादाभाई, मल्हारराव व त्याचे अनुयायी असा शहरवासी पक्ष, आणि फेअरसाहेब व मृत खंडेरावाचे पक्षपाती असा लष्करातील पक्ष या दोहोंतील युद्धाच्या स्वरूपानें दादाभाईची कारकीर्द सुरू झाली

मल्हाररावाच्या राज्यव्यवस्थेची चौकशी करण्यासाठीं नेमिलेल्या कमिशनाचा रिपोर्ट सन १८७४च्या मार्च महिन्यात तयार झाला, व तो ताबडतोब मल्हाररावांकडे पाठविण्यात आला सरदाराच्या तक्रारी, दरकदारांच्या तक्रारी असे निरनिराळे वर्ग कमिशननें केले होते या रिपोर्टाच्या बाबतींत दादादाईस गोत्यांत आणण्याचें फेअरनें ठरविलें. दर मंगळवारीं व गुरुवारीं रेसिडेंटकडे खेप घालण्याची

मल्हाररावांची रीत असे आता फेअरनें असा कावेबाजपणा सुरू केला कीं, मल्हाररावांची गांठ पडली कीं, कधीं गभीरपणें तर कधीं थट्टेनें त्यांस म्हणावयाचें ‘ कमिशनचा रिपोर्ट आला आहे ना? तुमचे दिवाण काय करताहेत? या रिपोर्टी ला खरमरीत जबाब देऊन तुमची बाजू राखण्याची ताकद नाहीं का त्यांच्यांत?” मनांतील हेतु हा कीं, मल्हाररावाच्या तगाद्याला त्रासून दादाभाईनीं रिपोर्टाला उत्तर दिलें कीं, सरकारला सांगावयाचें ‘हें पहा, मल्हाररावांच्या अनन्वित कृत्यावरसुद्धां पांघरूण घालण्यास दादाभाई तयार आहेत असल्या दिवाणांच्या हातून राज्याची काय सुधारणा होणार?’ आणि फेअरच्या अनुमानाप्रमाणें थोडेंबहुत झालेंही मल्हाररावानीं दादाभाईमागें सारखा लकडा लावला कीं, कमिशनने काढलेल्या माझ्या चुकाचें समर्थन करणारा एक खलिता तयार करा तो आपण सरकारकडे पाठवू दादाभाईनीं त्यांस एकच उत्तर द्यावयाचा क्रम सुरू केला कीं, ‘असें समर्थन करणें तुम्हांस हितकारक नाहीं’. रिपोर्टाविषयींचा हा गोंधळ चालू असतांना उन्हाळा सुरू झाला व मल्हारराव, दादाभाई, फेअर वगैरे सर्व मडळी नवसारीस राहावयास गेली.

नवसारीच्या मुक्कामात आणखी एक चकमक झडली. लक्ष्मीबाई नांवाची एक स्त्री मल्हाररावांच्या दृष्टीस पडल्यापासून त्याची तिच्यावर आसक्ति जडली होती त्यांनीं तिला लगेच आपल्या झनान्यांतही आणून ठेविलें होतें या गोष्टीस पुष्कळ दिवस झाल्यावर आतां तिच्याशीं राजरोसपणें लग्न लावण्याचें मल्हार-रावानीं ठरविलें. नवसारीस लग्नसमारभ झाला, व त्यानिमित्त एक जगी दरबार भरविण्यात आला या दरबारास आपण स्वतः हजर न राहतां फेअरनें आपल्या एका हस्तकाकरवीं अत्यंत अपमानकारक असा निरोप पाठविला या हस्तकानें भर दरबारात तें मानभगाचे शब्द उच्चारतांच सर्वांस अत्यत संताप आला. हल्लीं बॅरिस्टर असलेले होरमसजी वाडिया त्या वेळीं दादाभाईच्या हाताखालीं होते त्यांनीं दादाभाईस फार आग्रह केला कीं, फेअरच्या या संतापजनक वर्तनाची तक्रार सरकारच्या कानावर गेलीच पाहिजे. दादाभाईनाही वाडियांचें म्हणणें पटलें व फेअरविरुद्ध एकःसणसणीत तक्रारपत्र तयार करून तें त्यांनीं व्हाइसरॉयकडे पाठवून दिलें. ही गोष्ट फेअरला कळतांच त्याच्या अंगाचा तिळपापड झाला, आणि दादाभाईविरुद्ध टाकलेला डाव अधिक नेटानें खेळण्यास त्यानें सुरुवात केली. कमिशननें केलेल्या रिपोर्टास उत्तर दिलेंच पाहिजे अशी मल्हाररावाची

समजूत करून देण्याची त्यानें शिकस्त केली मल्हाररावांसही वाटू लागलें कीं, रिपोर्टास उत्तर दिलें नाहीं तर आपला घात होणार. त्यांनीं दादाभाईजवळ अगदीं हट्ट धरला कीं, 'रिपोर्टास चांगला जबाब द्या' दादाभाईंनीं आपला नकार सारखा चालू ठेविला व शेवटीं सांगितलें कीं, " महाराज, विचार करून एखादा निश्चय ठरविला कीं, त्यापासून मी कालत्रयींही ढळणार नाहीं माझें उपनांव दोर्डी-सुभाची दोरी-आहे मला जाळलात तरी माझा पीळ सुटणार नाहीं " त्यांनीं मल्हार-रावांस अनेकदां सांगितलें कीं, कमिशननें तुमचे जे अपराध दाखविले आहेत त्यां-पैकीं एकाचेंही समर्थन न करतां रिपोर्टास उत्तर म्हणून तुम्हीं एवढेंच म्हणावयाचें कीं " सरकारनें झाल्या गेल्या गोष्टी विसराव्या माझें राज्य सुधारण्यासाठीं मीं नवा दिवाण आणलेला आहे त्याच्या मदतीनें माझी राज्यव्यवस्था मी कितपत सुधारतों तें वर्ष दोन वर्षे सरकारनें पहावें " परतु मल्हाररावाची समजूत पटेना व दादाभाई म्हणूं लागले कीं, " माझें म्हणणें तुम्हास ऐकावयाचें नसेल तर बडोदें सोडून मी चालता होतों " या गोष्टीचा शेवट काय होणार हें कोणालाच कळेना. अखेर एके दिवशीं दुपारीं बारा वाजतां मल्हाररावांची गाडी दादाभाईंच्या बंगल्यांत शिरली व मल्हारराव खालीं उतरले भर बारा वाजता फिरावयास जाण्याचा रोजचा क्रम असे परंतु त्यांस आपल्या बंगल्यांत शिरतांना पाहून दादाभाईंस व वाडियांस आश्चर्य वाटलें मल्हारराव एकदम ओरडून म्हणाले, " दादाभाई, लवकर आटपा, आपण जरा फिरावयास जाऊं " आपलें आश्चर्य प्रगट न करतां दादाभाई व वाडिया गाडींत बसले व गाडी वेगानें चालू लागली जरा वेळानें मल्हारराव म्हणाले, " दादाभाई, तुमचें म्हणणें मला पटलें तुम्ही म्हणता तसें उत्तर तुम्ही तयार करा, मी त्याच्यावर सही करतों. पण ही गोष्ट कोणासही कळू देऊं नका कारण माझ्या सभोंवार दुष्ट मसलतगार पसरलेले आहेत, व त्यांच्यामध्यें मी असलों कीं, त्यांच्या म्हणण्याचें खंडन करण्याची शक्तीच माझ्यांत उरत नाहीं. त्यांच्या-पासून दूर असलों, कीं माझें हिताहित मला कळतें पण जाऊं द्या तें ! तुम्ही उत्तर तयार करा, मी सर्वांना बडोद्यास घालवून देतों "

ताबडतोब रिपोर्टास उत्तर तयार करून दादाभाईंनीं तें वाडियांच्या ताब्यांत दिलें. सर्व दरबाऱ्यांनीं एकदम बडोद्यास निघून जावें असा मल्हाररावांनीं हुकूम सोडला. उन्हाळ्यानिमित्त झालेला महाराजांचा नवसारीचा मुक्काम आतां तीन चार दिवसांत हालणार होता. नवसारीहून महाराज बडोद्यास आले कीं त्यांचें स्वागत

करण्यास रेसिडेंटनें बडोद्याच्या स्टेशनवर हजर असलें पाहिजे असा प्रघात होता. म्हणून फेअरसाहेबांची स्वारीही नवसरीहून निघून गेली. शेवटीं मल्हारराव, दादाभाई व वाडिया हे स्पेशल ट्रेननें बडोद्यास आले नेहमींप्रमाणें दरबार झाला. दरबारचें ठरलेलें काम आटोपल्यावर फेअर मुजरा करून निघून गेला दादाभाई व वाडिया जाऊं लागले, परंतु मल्हाररावांनीं त्यास थांबण्यास सांगितलें दरबार खलास होतांच सिंहासनावरून उतरून, "उत्तर तयार आहे का?" असें त्यांनीं दादाभाईस विचारलें तावडतोब वाडियांनीं उत्तराचा कागद पुढें केला. पिशाच्चानें पछाडलेल्या माणसाप्रमाणें कावऱ्याबावऱ्या नजरेनें मल्हाररावांनीं तो कागद हातांत घेतला, झटकन् डोळे मिटून त्यावर आपली सही केली, तो कागद सरकारकडे पाठविण्यासाठीं गोविंदराव मामा, बापूभाई याच्याजवळ कांपऱ्या हातानें दिला, आणि आपल्या महालाकडे धांव घेऊन आंतून दार लावून घेतलें. दादाभाईच्या उपदेशाप्रमाणें वागण्याच्या सत्कृत्यापासून परावृत्त करण्यास कोणी तरी दुष्ट माणूस आपल्या पुढें येईल अशी मल्हाररावांस सारखी भीति वाटत होती, म्हणून त्यांनीं वेडाची लहर आल्याप्रमाणें हें वर्तन केलें असावें

अशा रीतीनें मल्हाररावाच्या सहीशिक्यानिशीं दादाभाईंनीं तयार केलेलें उत्तर सरकारकडे सन १८७४च्या जूनमध्यें पाठविण्यांत आलें फेअरनें दादाभाईस गोत्यांत आणण्याचा केलेला खटाटोप व्यर्थ गेला. फजीत पावल्यामुळें फेअर चिडून गेला व दादाभाईवर सूड उगविण्याची इच्छा त्याच्या मनांत अधिकच प्रबल झाली.

या त्याच्या इच्छेला जुलै महिन्यांत भक्ष्य मिळालें! गोपाळराव गायकवाडांची एक पुतणी पवार नावाच्या एका सरदाराला दिलेली होती. हा पवार सरदार थोडासा चैनी असे व आपल्या बायकोस थोडी कडकपणें वागवी. ती राजकन्या मानी होती आपल्या नवऱ्याच्या वर्तनानें ती चिडून गेली व 'याच्या घरीं मी राहणार नाहीं' असें म्हणून 'मोतीबागेंत' येऊन राहिली. पवारांच्या मित्रांनीं त्यास भर दिल्यामुळें तोही हट्टास पेटला, व बायकोला जबरदस्तीनें घरीं परत आणावयाचें त्यानें ठरविलें. या नवराबायकोच्या भांडणाची संधि फेअरनें साधली व सांगितलें कीं, मी तुम्हांस हत्यारबंद जवान पुरवतों, तुम्ही राजकन्येला बळजबरीनें मोतीबागेंतून ओढून आणा. हें राजकन्येस कळतांच ती रागानें लाल

झाली. तिनें आपल्या बागेभोंवती सशस्त्र अरबांचा पहारा ठेविला आणि अगदीं उघडपणें युद्धाची तयारी केली या हकीगतीचा इतिहास पहिल्यापासून दादाभाईंच्या कानावर रोजच्या रोज जात असे, परंतु गोष्टी इतक्या थराला जातील अशी त्यास कल्पना नव्हती आतां कांहीं तरी उपाय करावयासच पाहिजे होता, नाहीं तर पवाराच्या व राजकन्येच्या अविचारानें व फेअरच्या मदतीनें मोतीबागेंत रक्तपात होऊन राज्याची अब्रू जाण्याचा संभव होता हा रक्तपात झाला म्हणजे दादाभाईंच्या कारभाराविषयीं वाटेल तसा ओरडा करून त्यांस पदभ्रष्ट करतां येईल असा फेअरचा कावा होता. दादाभाईंनीं हा कावा ओळखला, व या प्रसंगीं फार शांतपणें व दक्षतेनें वागण्याचें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं प्रथम राजकन्येस चार उपदेशाच्या गोष्टी सांगून नवऱ्याकडे जाण्याविषयीं तिला विनंति करण्यास वाडिया यांस पाठविलें त्याप्रमाणें वाडिया तिजकडे गेले व तिच्या हट्टानें सबंध राज्यावर केवढें संकट ओढवण्याचा संभव आहे हें तिला समजावून सांगू लागले परंतु, राजकन्या रागानें म्हणाली, " मी मानी गायकवाडाची कन्या असतांना मला असें वागवितात ! हें मी सहन करणार नाहीं " ती कांहीं केल्या ऐकत नाहीं असें पाहून वाडिया परत आले आता निराळाच उपाय अमलांत आणण्याचें दादाभाईंनीं ठरविलें दुसऱ्या दिवशीं पवार मोतीबागेवर हल्ला करणार आहे असें त्यास कळलें होतें ते एकदम फेअरच्या बंगल्यावर गेले त्यांनीं फेअरला अगदीं उघड उघड तोंडावर विचारलें कीं, " तुम्ही पवारला गुप्तपणें मदत पोंचविली आहे हें खरें काय ! " या अनपेक्षित सडेतोड प्रश्नानें फेअर गोंधळून गेला व 'होय' म्हणाला, तेव्हां दादाभाईंनीं त्यास सांगितलें कीं, " आता येवढें करा कीं, उद्यापर्यंत तरी निदान कांहीं दंगल होऊं देऊं नका तुमच्या शिपायांस आंवरून धरा तोंपर्यंत या भांडणाचा मी निकाल लावतों " फेअरनें तें कबूल केलें, व दादाभाई लगेच पवारांच्या वाड्यांत गेले. तेथें त्यांचें व त्यांच्या दोस्तांचें खलबत चाललें होतें. त्यांसही दादाभाईंनीं हेंच सांगितलें कीं, " भांडणाचा अगदीं शांततेनें शेवट करण्याचा मी प्रयत्न करतों, परंतु तोंपर्यंत अगदीं स्वस्थ बसण्याचें मला वचन द्या." त्या मंडळींनीं तें कबूल केल्यावर दादाभाई थेट मल्हाररावांकडे गेले. सरकारस्वारी त्या वेळीं निजलेली होती. दादाभाईंनीं बराच वेळ वाट पाहिली; परंतु मल्हारराव महालांतून उठून बाहेर येईनात. एकेक क्षण मोलाचा होता, व दिरंगाई झाल्यास संकट ओढवण्याची धास्ती होती. " आपण

आपल्या सासरीं परत गेलां नाहीं तर आपली नेमणूक बंद होईल." असा राज-कन्येला निरोप पाठवावयाचें दादाभाईंनीं ठरविलें होतें. परंतु या निरोपावर मल्हाररावांचें शिक्कामोर्तब असणें अवश्य होतें. मल्हाररावांची तर झोंप सपेना शेवटीं आपल्या जवळच्या सरकारी शिक्क्याचा उपयोग करण्याचें दादाभाईंनीं ठरविलें, व बळवंतराव यशवत यांच्या साहाय्यानें त्यांनीं आपला बेत पार पाडला. दादाभाईंची युक्ति इतकी बेमालूम फलद्रूप झाली कीं, तो निरोप कळतांच राज-कन्येचा हट्ट पार नाहींसा झाला आपण सासरीं जावयाचें तिनें कबूल केलें अशा प्रकारें फेअरच्या चिथावणीनें उत्पन्न झालेलें भयकर वादळ दादाभाईंच्या मुत्सद्दे-गिरीनें एका क्षणात नाहींसें झालें. दादाभाईनी या बाबतींत जें किंचित् स्वैर वर्तन केलें त्याबद्दल मल्हारराव पुढें रागावले, परतु वाडियानीं त्यास स्पष्ट सांगि-तलें कीं, " महाराज, त्या वेळीं दादाभाईंनीं जर आपल्या समतीची वाट पाहण्यात वेळ घालविला असता तर आपण या गादीवर आज राहिलां असता कीं नाहीं कोण जाणे ! " हे शब्द मल्हाररावास पटले व सर्व राग विसरून सकट टाळल्या-बद्दल त्यानीं दादाभाईंस शाबासकी दिली

फेअरचे व्यूह याप्रमाणें दोन्ही वेळा ढासळून पडले त्यामुळें अगदीं बारीक सारीक गोष्टीं तदेखील दादाभाईस छळावयाचें त्यानें ठरविलें प्रजाजनांपैकीं कित्येकास त्यानें उत्तेजन देऊन दादाभाईकडे तक्रारी न्यावयास लावलें अनेक लोकाचीं गाऱ्हाणीं मुद्दाम उत्पन्न करून त्यांची नोंद आपल्याकडे करून घ्यावया-ची व माझ्याकडे अमुक मनुष्य अमुक तक्रार करीत आहे, त्याबद्दल तुमचा खुलासा काय आहे, अशीं पत्रें रोजच्या रोज दादाभाईकडे पाठवावयाची असा क्रम त्यानें सुरू केला हीं असलीं पत्रें फेअरकडून आलीं कीं त्यास उत्तरें देणें भागच पडे, व हजारों खतावण्या धुंडाळून, व पूर्वीचीं दप्तरें पालथीं घालून तीं उत्तरें तयार करण्यात दादाभाई, वाडिया व बाळमगेश वगैरे त्यांचे मदतगार याचा अतिशय वेळ जात असे फेअरकडून ज्या तक्रारी येत असत त्या सर्व शुष्क आणि पोकळ असत, परतु त्यांस उत्तर देणें अवश्य असल्यामुळें त्यांच्या-कडे लक्ष द्यावें लागे. हा एकदर प्रकार अतिशय त्रासाचा आणि चीड उत्पन्न करण्यासारखा होता मोठमोठ्या सुधारणा घडवून आणण्याचे बेत दादाभाईंच्या मनांतल्या मनांत राहूं लागले, कारण फेअरकडून रोज येणाऱ्या कर्मकटकटीपुढें या बेतांविषयीं विचार करण्यास फुरसतच उरत नसे. याचा परिणाम असा

झाला कीं, दगदगीमुळें दादाभाई आजारी पडले आणि मानसिक त्रासामुळें तो आजार वाढू लागला शिवाय, कमिशनच्या रिपोर्टास जें उत्तर दादाभाईंकडून गेलें होतें त्याविषयीं कांहींच जबाब सरकारांतून अद्याप आला नव्हता. त्यामुळें दादाभाईंच्या मनाला फार काळजी लागून राहिली त्याची प्रकृति दिवसेंदिवस अगदीं क्षीण होऊ लागली, व शेवटीं डॉक्टरच्या सल्ल्यावरून त्यांस एका अंधार कोठडींत ठेवण्यापर्यंत मजल आली पावसाळ्याची निरुत्साही हवा पसरली काय करावें काय नाहीं अशा मनःस्थितींत, वाडिया, बाळमंगेश वगैरे मडळींचे दिवस जाऊ लागले कसली बडोद्याची सुधारणा आणि कसलें काय, एकदां दादाभाई बरे झाले कीं मिळवली असें त्यास वाटूं लागलें

अशा स्थितींत एके दिवशीं लॉर्ड नॉर्थब्रुक याजकडून एक पत्र आलें. रिपोर्टास जें उत्तर बडोद्याहून रवाना झालें होतें त्याविषयीं त्यांत कांहीं तरी मजकूर आहे असें बळवतराव यशवत यास कळलें त्यांचें दादाभाईंवर फार प्रेम असे त्यांनीं वाडियास ताबडतोब बोलावून आणून सांगितलें कीं, नॉर्थब्रुक-साहेबाकडून असें असें पत्र आलें आहे दादाभाईंची तब्येत त्या वेळीं फारच बिघडलेली असल्यामुळें त्यांस ही बातमी एकदम कळविणें इष्ट नव्हतें. म्हणून वाडियानीं अगदीं सदिग्धपणे त्याजजवळ ही बातमी केवळ लोकवार्ता म्हणून सांगितली परंतु रात्रीं पावसाची भयकर झोड चालू असता मल्हाररावाकडून दादाभाईस नेण्यासाठीं शिपाई आला. आपल्या प्रकृतीचा यत्किंचितही विचार मनात न आणता दादाभाई महाराजाकडे गेले महाराजानीं निमूटपणें नॉर्थब्रुकचें पत्र त्याजजवळ दिलें तें वाचल्यावर कोणताही विकार न करता 'ठीक' असें म्हणून त्यानीं तें खालीं ठेवलें. दादाभाईंची ती शात वृत्ति पाहून आश्चर्यचकित होऊन मल्हारराव म्हणाले, "दादाभाई, आपण बोलत का नाहीं ?"

मल्हाररावाकडे गभीर मुद्रेनें पाहात दादाभाईंनीं उत्तर दिलें, "महाराज, सर्व लहानमोठ्या गोष्टींचा नियंता परमेश्वर आहे त्याची तुमच्यावर कृपादृष्टि आहे. आपण रिपोर्टास जें उत्तर धाडलें त्यास समति दर्शविणारें हें पत्र आज नॉर्थब्रुक-कडून आलें"

पूर्वीच्या सर्व अपराधांची मल्हाररावांस सरकारनें क्षमा केली आहे अशा आशयाच्या नॉर्थब्रुकच्या या पत्रानंतर दादाभाईंस जरा हुरूप आला व त्यांची प्रकृति हल्के हल्के सुधारत चालली. तरी फेफरचा त्रास कांहीं मंदावला नव्हता;

उलट तो वाढतच होता. शेवटीं दादाभाईंनीं ठरविलें कीं, फेअरच्या वर्तनाविषयीं सरकारांत तक्रार करून फेअरला बडोद्याच्या रेसिडेंटच्या जागेवरून दूर करण्याविषयीं मागणी करावी याविषयीं त्यानीं मल्हाररावाचा व इतरांचा सल्ला घेतला दादाभाईंचा बेत ऐकून मल्हाररावास तर फार आनंद झाला. खंडेरावाच्या पक्षाच्या दरबारी मंडळीस उघड उघड उत्तेजन फेअरकडून मिळत असे व आपले दोष काढून आपणांस पदभ्रष्ट करूं पाहणारा फेअर आहे अशी मल्हाररावांची पुरी खात्री होती. फेअर बडोद्यातून गेला तर आपल्या डोक्यावर सदैव टांगलेली नगी तरवार दूर होईल अशी मल्हाररावांची कल्पना असल्यामुळें त्यानीं दादाभाईंच्या सूचनेस अगदीं मनापासून दुजोरा दिला. नंतर फेअरच्या हातून झालेल्या गैरवर्तनाची एक खुलासेवार यादी तयार करून फेअर जोंपर्यंत रेसिडेंट आहे तोंपर्यंत माझ्या हातून कांहीं होणें शक्य नाहीं बडोद्याची सुधारणा व्हावी अशी सरकारची इच्छा असेल तर फेअरला दूर करावा, अशा प्रकारचा एक खलिता दादाभाईंनीं लिहून काढला, आणि तो व्हाइसरॉयाकडे रवाना करण्यासाठीं फेअरकडे पाठवून दिला.

यानंतर दोनतीनच दिवसांनीं जी एक वाईट गोष्ट घडून आली ती झाली नसती तर बडोद्याचें राज्य दादाभाईंच्या हातून कल्पनेपलीकडे सुधारलें गेलें असतें ती गोष्ट अशी. रोज सकाळीं रपेट करावयास जावयाचा फेअरचा क्रम असे फेअर परत येईपर्यंत त्याचा गडी एक सरबताचा पेला तयार करून त्याच्या टेबलावर ठेवी, आणि फिरून परत आल्याबरोबर त्या पेल्यातील सरबत पिऊन आपल्या कामाला लागावयाचें असा फेअरचा रोजचा प्रघात असे. हा क्रम कित्येक महिने अव्याहत चालला होता सन १८७१च्या नव्हेंबर ता ९ रोजीं सकाळीं फेअर रपेट करून परत आला व नित्याप्रमाणें त्यानें टेबलावरील सरबताचा पेला आपल्या तोंडाला लावला सरबताचा एक घोट घेतला असेल नसेल तोंच त्याचें तोंड कडूझार झालें. सरबतांत कांहीं तरी विषारी पदार्थ असला पाहिजे अशी शंका येऊन फेअरनें ताबडतोब तोंडातील चूळ व्हरांड्यात जोरानें ओकून टाकली. त्याबरोबर दगडावर विषारी वण उठला! लगेच काय झालें याची हकीगत चिठीवर लिहून तें सरबत परीक्षणासाठीं फेअरनें सिव्हिल सर्जनकडे पाठवून दिलें. सिव्हिल सर्जननें त्या सरबतांत arsenic होतें असा निकाल दिला. फेअरनें या सर्व प्रकरणाचा रिपोर्ट तयार करून व्हाइसरॉयकडे

पाठवून दिला. मात्र झालेल्या हकीगतीचा यत्किंचितही बोभाटा होऊं न देण्याची त्यानें खबरदारी घेतली. याप्रमाणें दादाभाईच्या तक्रारपत्रकाबरोबरच फेअरचा हा रिपोर्टही सरकारकडे गेला.

दादाभाईनीं सरकारकडे पाठविलेल्या तक्रारींचा चांगला उपयोग झाला फेअरला रेसिडेंटच्या जागेवरून काढण्यांत येऊन त्याच्या जागीं सर पेली यास नेमण्यांत आलें, आणि पेलीसाहेबांससुद्धा रेसिडेंट या नात्यानें नव्हे तर गव्हर्नर जनरलचे एजंट म्हणून पाठविण्यात आलें पेलीसाहेब फार विद्वान् व सज्जन असून दादाभाईस मदत करण्याची त्यांची बळकट इच्छा होती. परंतु दुर्दैव हें कीं, फेअरवर विषप्रयोग करण्याचा जो प्रयत्न झाला त्याचा तलास लावण्याचा हुकूम पेली यांस झालेला होता.

सर लुइस पेली यास दादाभाईबद्दल इतका आदर होता कीं, बडोद्यास आल्या वर दोन तीन दिवसांनीं त्यांनीं खंडेरावाच्या पक्षाच्या सर्व मंडळीस एके ठिकाणीं जमविलें, व दादाभाईस तेथें घेऊन जाऊन सर्वांस बजावून सांगितलें कीं, " तुमचे खरे धनी दादाभाई आहेत तुमच्या काहीं तक्रारी असतील तर त्या माझ्याकडे न आणता त्यांच्याकडे एकदम नेत जा. माझा तुमचा काहीं संबंध नाहीं मला मध्यें घालून दादाभाईच्या मार्गांत अडथळे आणण्याचें तुमच्या मनांत असेल तर तें अत्यंत निंद्य होय, व तें मला बिलकुल खपणार नाहीं तुम्हीं दादाभाईस मदतच केली पाहिजे " या खंडेरावपक्षीय जुन्या मंडळीच्या हातून दादाभाईस मदत होणें तर अशक्यच होतें, परंतु प्रत्यक्ष अडचणी उत्पन्न करण्याचें पेलीसाहेबांनीं बंद केल्यावर दादाभाईस अप्रत्यक्षपणें खालीं ओढण्याचें एक साधन लवकरच या जुन्या मंडळीच्या हातीं आलें.

दादाभाई बडोद्यास येण्यापूर्वी अशी पद्धत असे कीं, राज्यांतील एखाद्या माणसाचें कोर्टांत काहीं काम असलें कीं, मल्हाररावांनीं वादीस व प्रतिवादीस स्पष्ट सांगावयाचें कीं, तुमच्यापैकीं जो मला अधिक पैसा नजराणा म्हणून देईल त्याच्या तर्फेचा निकाल देण्यांत येईल. अशा प्रकारें न्यायाचे अगदीं उघड उघड लिलाव चालत असत कित्येकांच्या असल्या खंडण्या खजिन्यांत जमा व्हावयाच्या अद्याप राहिल्या होत्या. अमुक माणसाकडून इतकी खंडणी अमुक तारखेस जमा व्हावयाची अशा तऱ्हेनें व्यवस्थित हिशेब वह्यांतून मांडलेले होते. दादाभाईनीं रा० रा० बाळमंगेश यांस न्यायाधीश नेमलें होतें. न्यायाच्या

विक्रीचा तो विचित्र हिशेब पाहून बाळमंगेश घाबरून गेले व त्यांनीं दादा-भाईस विचारलें कीं, या येणें असलेल्या न्यायाच्या किंमती खरोखरच वसूल करावयाच्या किंवा कसें ? बाळमंगेश यांनीं सांगितलेली हकीगत ऐकून दादा-भाईस महदाश्चर्य वाटलें व त्यांनीं स्पष्ट बजावलें कीं, असल्या कोणत्याही रकमांची सरकारांत जमा होऊं द्यावयाची नाहीं दादाभाईंचा हा हुकूम मल्हार-रावांच्या कानीं गेला तेव्हां त्यांस किंचित् राग आला, पण दादाभाई करतील तें चांगल्यासाठींच करतील असा विचार करून त्यांनीं आपला राग विशेष दाखविला नाहीं जुन्या मंडळीला येथें बरोबर संधि सांपडली त्यांनीं मल्हार-रावांस असें सांगण्याचा क्रम सुरू केला कीं, " महाराज, तुम्हीं ज्या नजराण्यांचे ठराव केलेत त्याच्याशीं दादाभाईंचा काय संबंध ? ते पैसे तुमचे आहेत या बाबतींत दादाभाईनीं सरकारच्या हक्कांची पायमल्ली चालविली आहे " या मसलतीमुळें मल्हारराव बिथरून गेले व त्यांनीं आग्रह धरला कीं, पूर्वीं ठरलेले हे नजराणे घेतलेच पाहिजेत परंतु असल्या त्रागयानें गडबडून जाण्याइतके दादा-भाई कच्च्या दिलाचे नव्हते. त्यांनीं मल्हाररावांस खडखडीत उत्तर दिलें कीं, " महाराज, या नजराण्यांच्या पैशांपैकीं एका पैला तुम्हीं स्पर्श केलात, कीं मी तडक स्टेशनची वाट धरीन " मल्हाररावाची स्थिति यानंतर अगदीं विलक्षण होऊन गेली धड दादाभाईंच्या जळजळीत निस्पृहतेला धिक्कारण्याचें त्यांना धैर्य होईना, धड जुन्या मंडळींतील चहाडखोरे दरबाऱ्यास दरडावून गप्प बस-विण्याइतका जोरही त्यांच्या अंगीं नव्हता. काय करावें काय नाहीं असें त्यांस होऊन गेलें एके दिवशीं त्यांच्याशीं बोलतां बोलतां वाडिया सहज म्हणाले, " महाराज, आम्ही या गोष्टी आमच्या स्वार्थासाठीं का करतों ? आमचें काय ? दादाभाई बडोद्यांतून केव्हां तरी जाणारच, मी जाणार, आणि ही जुनी दरबारी मंडळीही कांहीं येथें कायमची नाहींत ! तुम्ही मात्र येथें राहाल ! तुमच्या हिता-साठीं सगळ्या गोष्टी झाल्या पाहिजेत, आणि तीच आमची खटपट आहे "

या बोलण्यानें मल्हारराव थोडेसे चमकले. वाडियांचें बोलणें ऐकून त्यांची सदसद्विवेकबुद्धि जागृत झाली, व विचारपूर्वक 'हुं—हुं' असें म्हणून ते स्वस्थ बसले.

हें नजराण्यांसंबंधींचें भांडण किती तरी दिवस चालू होतें. हें एकच भांडण सुरू होतें असें नव्हे, तर कांहीं ना कांहीं तरी बारीकसारीक गोष्ट उकरून काढून

दादाभाईविषयीं मल्हाररावांचें मन कलुषित करण्याचा जुन्या मंडळीनें सपाटा चालविला फेअरसारखा शत्रु वाटेवेगळा झाल्यामुळें जो कांहीं हुरूप दादाभाईस आला होता त्यावर या नव्या कुरबुरीमुळें विरजण पडूं लागले. सर लुइस पेली यांचें लग्न झालें नव्हतें व चैनीकडे त्याची थोडीशी प्रवृत्ति होती. या गोष्टीचा फायदा घेऊन पेलीसाहेबांविषयीं कुजक्या बातम्या उठविण्यासही जुन्या दरबाऱ्यांनीं प्रारंभ केला कांहीं पैशाची गोष्ट निघून दादाभाईनीं ती मल्हाररावां-कडे मंजुरीसाठीं पाठविली कीं, या दरबाऱ्यांनीं म्हणावें, “ महाराज, मंजुरीचा हा नुसता तमाशा आहे आम्हांला तर यांत कांहीं अर्थ दिसत नाहीं लोक तर म्हणतात राज्याचे मालक, चालक सर्व कांहीं दादाभाई ! मल्हारराव आपले–पण जाऊं द्या. आम्हीं या गोष्टी सरकारजवळ कशाला बोलाव्या ! ” मल्हाररावांच्या अंतःकरणात या विषाच्या पिचकाऱ्या मारण्याचें काम अव्याहत चालू झालें याचा परिणाम असा झाला कीं, दादाभाईविषयीं मल्हारराव अत्यंत संशयग्रस्त झाले, व दादाभाईच्या कोणत्याही म्हणण्याला झट्‌कन समति द्यावयाची नाहीं, प्रत्येक बाबीला हजार फाटे फोडावयाचे असें वर्तन त्यांनीं आरंभिलें शेवटीं या एकदर प्रकाराची दादाभाईस अगदीं चीड आली शेवटीं, त्यांनीं मल्हाररावास सांगितलें कीं, एकजात सर्व जुन्या दरबाऱ्यांना राज्याबाहेर घालवून तरी द्या, नाहीं तर माझा राजीनामा तरी मंजूर करा

हा खटका पेलीसाहेबाच्या कानावर गेला तेव्हा त्यांनीं दादाभाईस बोलावून घेऊन त्यांचीं आर्जवें केलीं कीं, तुमच्यासारख्या मंडळीच्या मदतीची संस्थानास अत्यंत जरूर आहे, होईल तितकें करून तुम्ही रहा परंतु, दादाभाईनीं त्यांस आपली अडचण खुलासेवार समजावून सांगितल्यावर पेलीसाहेबाची खात्री पटली. त्यानीं मल्हाररावाची गांठ घेतली, व जुन्या दरबाऱ्यांच्या मूर्खपणामुळें दादाभाईच्या कामांत व्यत्यय येऊन संस्थानचें केवढें अहित होत आहे तें त्यांस समजावून सांगितलें. पुष्कळ बोलणें झाल्यावर मल्हाररावांनीं कबूल केलें कीं, मी सर्वांस घालवून देतों, पण दामोदरपंतास दूर करावयास मी कधींही तयार होणार नाहीं. वास्तविक स्थिति अशी होती कीं, दामोदरपंत म्हणजे मल्हाररावांच्या दुष्ट मसलतगारांचा राजा होता. दामोदरपंत खेरीज इतर लोक राहिले तरी हरकत नव्हती. पण दामोदरपंतास ठेवून इतर लोकांस घालविणें म्हणजे खोकला झाल्या-

-वर फक्त आंबट पदार्थ खाऊन इतर पदार्थ वर्ज्य करण्यासारखें होतें. यामुळें मल्हाररावांच्या म्हणण्यास दादाभाई कबूल होईनात व अखेर बडोद्याहून जाण्याचा निश्चय त्यांनीं जवळ जवळ कायम केला.

मध्यंतरीं फेअरच्या विषप्रयोगाविषयींची चौकशी जोरानें चालू होती मुबईचे पोलीस कमिशनर फ्रँक सूटर हे मुद्दाम बडोद्यास आले होते, व त्यांस मदतगार म्हणून अहमदाबादचे गजानन विठ्ठल काम करीत होते. वाडिया हे बडोद्याच्या फौजदारीचें काम पहात असत दामोदरपंतानें फौजदारी खात्यामार्फत कधीं arsenic आणलें होतें काय ! किती आणलें होतें ! इतकें आणण्याची खरोखरीच जरुरी होती काय ! वगैरे अनेक प्रश्नांना वाडियाना उत्तरें द्यावीं लागलीं. तीन-चार अरब नोकराच्या घरांची झडती घेण्यांत आली परतु इतका खटाटोप करून कांहींसुद्धा निष्पन्न होईना शेवटीं फ्रँक सूटर निराश होऊन मुबईस परत जावयाच्या विचारांत होते, इतक्यांत—

फेअरच्या तैनातींत असलेला एक मराठा नाईक व एक अरब चाऊस यांनीं कबुली दिली कीं, दामोदरपंताच्या सांगण्यावरून आम्हीं फेअरच्या सरबतात arsenic घातलें होतें. या कबुलीमुळें दामोदरपंत अपराधी ठरत होता. परतु दामोदरपंतास माफीचा साक्षीदार करण्यात आलें व मल्हाररावांवर खटला करण्यात आला

इतकें झाल्यावर दादाभाईंस बडोद्यांत राहणें शक्यच नव्हतें वाडिया, बाळमगेश वगैरे मडळींसह ते मुबईस परत आले मल्हारराव कितीही वाईट असले तरी फेअरवर विषप्रयोग करण्याइतके नीच अतःकरणाचे ते खास नाहींत असें दादाभाईंस वाटत होते. परंतु दामोदरपंतानें मल्हाररावांचें नांव सांगितल्यावर त्याविरुद्ध कांहींच लेखी पुरावा पुढें करणें शक्य नव्हतें. मल्हाररावाविरुद्ध सुरू होणाऱ्या खटल्यात मुंबईचे सॉलिसिटर्स जेफरसन् अँड पेन हे काम करणार होते, व त्यांस भाईशंकर नानाभाई हे मदत होते. मल्हाररावांच्या बाजूचा पुरावा तयार करण्यासाठीं भाईशंकर नानाभाई बडोद्यास गेले. परंतु जुन्या मंत्रीमंडळाच्या सांगणीवरून बडोद्यांतील सर्व लोकांनीं कानांवर हात ठेवून कोणत्याही प्रकारची साक्ष देण्याचें नाकारलें. कोणीही कांहींही सांगेना, तेव्हां भाईशंकर नानाभाई मुंबईस दादाभाईंकडे येऊन म्हणाले कीं, आतां करावयाचें कसें ! तें

याहून आपल्या बडोद्याच्या कारभारांतील जे कांहीं कागदपत्र वाडियांजवळ होते ते सर्व दादाभाईंनीं भाईशंकर यांच्या स्वाधीन केले इंग्लंडमधील त्या वेळचे सर्वोत्कृष्ट कायदेपंडित सार्जंट बॅलंटाईन यांस १०,००० गिनी देऊन मल्हार-रावांचें काम चालविण्यासाठीं बोलावण्यांत आलें होतें व ते इंग्लंडहून निघालेही होते एडन बंदरांत त्यांच्या हातीं पडतील अशा बेतानें दादाभाईंचे कागदपत्र पाठविण्यांत आले. एडनहून मुंबईस येईपर्यंत बॅलंटाइननीं ते कागदपत्र वाचले व मल्हाररावाच्या बाजूचा पुरावा तयार केला. मुबईस आल्याबरोबर त्यांनीं दादाभाईंची गांठ घेतली व तयार केलेला पुरावा त्यांस सांगितला तो असा कीं, फेअरला विषप्रयोग करण्याचा ज्या दिवशीं प्रयत्न झाला त्याच्या आधींच तीन दिनस फेअरला काढून टाकण्याविषयींचा खलिता दादाभाईंनीं सरकारला पाठविला होता. ही गोष्ट मल्हाररावांस पूर्णपणें माहीत होती तेव्हां फेअरचें व मल्हाररावाचें वैर होतें असें जरी गृहीत धरलें तरी सनदशीर मार्गानें फेअरला दूर करण्याचा प्रयत्न केल्यानंतर बेकायदेशीर वाममार्गाचा अवलब करण्याचें मल्हाररावांस कांहींच कारण नव्हतें

बॅलटाईनच्या या पुराव्यास दादाभाईंनीं समति दिली याच पुराव्याच्या जोरावर मल्हाररावांची बाजू बॅलंटाईननीं कोर्टांत पुढें माडली, व आनंदाची गोष्ट ही कीं, दामोदरपतांची साक्ष फुकट जाऊन कोर्टानें 'Not proved' असा निकाल दिला व मल्हारराव सुटले

याप्रमाणें दादाभाईंच्या दिवाणगिरीचा किंचित् उदास असा शेवट झाला. अनेक अडचणी असूनही राज्यव्यवस्थेंत त्यांनीं सुधारणा केल्या, न्यायखात्यांतील नजराणे घेण्याची वाईट पद्धति त्यांनीं पार मोडून टाकली, कायद्यांचें कोडही त्यांनीं सुधारून वाढविलें, हें सर्व खरें, परंतु ज्या ईर्षेनें व उल्हासानें ते बडोद्यास आले त्याचा अगदीं पुरा अत होऊन त्यांना बडोद्यांतून जावें लागलें बडोद्याची नोकरी पतकरण्यापूर्वी दादाभाईंच्या मनांत अनेक आकांक्षा होत्या. देशी संस्थानिकांना मनापासून मदत करून त्यांचा दर्जा आपण वाढवूं, संस्थानांचीं मुलकी, लष्करी, न्याय वगैरे खातीं अत्यंत सुधारून संस्थानिक प्रजेला ब्रिटिश प्रजेपेक्षां हजारों पटींनीं सुखी करूं व ब्रिटिश अधिकाऱ्यांना लाजेनें खालीं मान घालावयास आपण लावू, वगैरे आशा हृदयाशीं प्रेमानें धरून दादाभाईंनीं बडोद्यांत

पाय घातला होता म्हणून बडोद्याच्या कारकीर्दीचें असें पर्यवसान झालेलें पाहून दादाभाईंना वाईट वाटलें. तथापि त्यांचा शांतपणा व गंभीरपणा विलक्षण होता. आपल्या हातून फारसें कार्य झालें नाहीं तर नाहीं, आपण अंतःकरणापासून केलेल्या खटपटीच्या पायावर पुढें कोणीतरी राज्यसुधारणेची इमारत उभारील, असा विचार करून बडोद्यांत घालविलेले दिवस एखाद्या दुष्ट स्वप्नाप्रमाणें विसरून टाकण्याचें दादाभाईंनीं ठरविलें

## प्रकरण सहावें

# कॉंग्रेसची स्थापना व पार्लमेंटमधील काम

मुंबईस आल्यानंतर दादाभाई स्वस्थ बसले नाहींत. स्वस्थ बसणें हा त्यांचा स्वभावच नव्हता सतत उद्योग आणि लोकसेवा याशिवाय ज्यांचें दुसरें कांहीं ध्येयच नव्हतें, ते दादाभाई हात जोडून विश्राति घेत राहतील, ही गोष्ट शक्यच नव्हती सन १८७५ मध्यें ते मुंबईच्या कार्पोरेशनचे सभासद झाले व टाऊन कौन्सिलांतही त्यांनीं प्रवेश केला या दोन्ही संस्थांचें काम त्यांनीं एक वर्षभर अतिशय हौसेनें व दक्षतेनें केलें त्या वेळीं मुंबईस हल्लींच्या सारखी पाण्याची व्यवस्था नव्हती नळ नसल्यामुळें इतर खेडेगावांप्रमाणें विहिरी व तलाव यातील पाण्याचा उपयोग शहरवासी लोक करीत असत 'ही गैरसोय दूर करण्यासाठीं विहार येथें पाण्याचा एक अजस्र साठा बांधवून तेथून नळांच्या साहाय्यानें मुंबईस पाणी पुरवावें असे सरकारनें ठरविलें. या कामाला फार पैसा लागावयाचा हें उघड होतें सरकारचें म्हणणें असें कीं, खर्च होणाऱ्या पैशापैकीं बराच मोठा भाग मुंबईच्या म्युनिसिपालिटीनें सोसावा. हा प्रश्न म्युनिसिपालिटीपुढें चर्चेला निघाल्यावर दादाभाईनीं सवाल केला कीं, सरकार म्हणत आहे इतक्या रकमेची या कामाला खरोखरच जरूर आहे कीं काय ? मुंबईची लोकसंख्या, लोकांना लागणाऱ्या पाण्याचा अदमास वगैरे गोष्टींसंबंधानें माहिती व आंकडे गोळा करून दादाभाईनीं असें सिद्ध केलें कीं, दर माणशीं दररोज सरासरी १७ गॅलन पाणी लागतें असा जो सरकारी हिशेब आहे तो चुकला आहे; १४ ग्यालन पाणी पुरें होतें, व या मुळांतल्या चुकीमुळें म्युनिसिपालिटीपाशीं सरकार मागत आहे ती रकम ५० लक्ष रुपयांनीं जास्त आहे. या मुद्द्यावर बराच वादविवाद झाला. आपली चूक कबूल करणें सरकारी कामगारांच्या जिवावर आलें परंतु दादाभाईंच्या बिनतोड आंकड्यांपुढें लटपट चालणें शक्य नव्हतें. हे अधिक आंकारलेले पन्नास लक्ष रुपये कमी करून बाकीचे पैसे आम्ही देतों, आणि तसें होत नसेल तर आम्हांला ही तुमची पाण्याच्या सोयीची योजना

**मुंबई कार्पोरेशनमधील काम**

गैरसोयीची वाटते आणि म्हणून पसंत नाहीं, असा दादाभाईच्या माहितीच्या जोरावर म्युनिसिपालिटीनें हट्ट धरला शेवटीं, सरकारनें म्युनिसिपालिटीचें म्हणणें कबूल केलें, विहार तलावाचें काम सुरू झालें, आणि दादाभाईच्या उद्योगानें म्युनिसिपालिटीचे पन्नास लाख रुपये वांचले सन १८७६ मध्यें त्यांनीं कार्पोरेशनमधील आपल्या जागेचा राजीनामा दिला

यापुढें अडीच तीन वर्षेंपर्यंत नमूद करण्यासारखें असें कोणचेंच मोठें काम त्यांनीं हातीं घेतलें नाहीं तथापि सन १८७३मध्यें फॉसेट कमिटी (Fawcett Committee) पुढें त्यांनीं आपल्या साक्षींत जें सांगितलें होतें कीं, राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें मोठ्या अधिकाराच्या आणि जबाबदारीच्या जागा हिंदुस्थानातील लोकांस देणें अत्यत इष्ट आणि जरूरीचें आहे, त्यासंबधीं त्यानीं सर पेरी याच्याशीं आतां पत्रव्यवहार सुरू ठेविला होता शिवाय सर डेव्हिड वेडरबर्न याच्याशीं पत्रद्वारें मागणी करून हिंदुस्थानांत आलेल्या गोऱ्या नोकर लोकाच्या पगाराचे व पेन्शन्चे आंकडे सरकारी दप्तरीं गुप्त ठेवलेले असत, ते प्रसिद्ध करण्याबद्दल त्यांनीं तगादा लाविला, आणि मि० हिंडमन यांच्याबरोबर हिंदुस्थानासबधाच्या अनेक प्रश्नांविषयीं पत्रद्वारें त्यांनीं बरीच चर्चा केली.

सन १८७६ ते सन १८७९ हीं तीन वर्षें दादाभाईच्या मनात निराशा उत्पन्न करण्यासारखीं गेलीं लॉर्ड लिटनची कारकीर्द सुरू होती आणि त्याच्या अनुदार

**निराशा**

धोरणामुळें ज्या अढळ विश्वासावर दादाभाईच्या राजकीय चळवळीची भिस्त होती, तोच विश्वास डळमळला हिंदुस्थानातल्या अधिकाऱ्यांची अरेरावी चालते याचें कारण त्याची गधवार्ताही विलायतेंतील मुत्सद्द्याना लागत नाहीं, आणि हिंदुस्थानच्या लोकाचें गाऱ्हाणें जर थेट पार्लमेंटपर्यंत पोहोचविले तर आपल्या तक्रारी दूर करण्याइतकी न्यायप्रियता विलायतच्या लोकात आहे, ही भावना दादाभाईस राजकारणांत नेहमीं उत्साह देत असे परंतु लिटनशाहीनें दादाभाईचें अंतःकरण विषण्ण झालें. लॉर्ड लिटनसारखे उच्च कुलात जन्मलेले व सुशिक्षित इंग्रज लोक अधिकारी झाल्यावर असे अन्यायानें वागातात याबद्दल दादाभाईस आश्चर्य वाटलें हिंदुस्थानच्या लोकांच्या कल्याणाविषयींचीं बोलणीं, ठरावांतील व जाहीरनाम्यांतील उदार वचनें हीं सर्व उधारच होणार कीं काय, आणि इंग्रजांचे न्यायप्रियतेचे उद्गार म्हणजे आमच्या डोळ्यांत धूळ फेंकण्यासाठीं पद्धतशीर

रचलेलें अवाढव्य ढोंगच आहे कीं काय, अशा शंका दादाभाईच्या मनांत आल्यावांचून कशा राहतील ? याच वेळीं काबूलच्या अमिराशीं ब्रिटिशांची लढाई झाली, तिला अतोनात पैसा खर्च झाला, आणि तो सर्व बोजा हिंदुस्थानच्या तिजोरीवर बसाविण्यांत आला यामुळें दादाभाईचें अतःकरण विदीर्ण झालें त्यांचें म्हणणें कीं, अफगाणिस्तानच्या बाजूनें ब्रिटिश राज्याला धक्का पोंचण्याचा संभव म्हणून इंग्रजानीं लढाई केली, तिचा फायदा ब्रिटिश राज्याला झाला, आणि खर्च तेवढा हिंदुस्थानचा काय म्हणून ? हिंदुस्थान दरिद्री आहे हें विलायतेस कोणी कळवीत नसावें, असें वाटून दादाभाईनीं हिंदुस्थानच्या दारिद्र्याचा प्रश्न हातीं घेतला हिंदुस्थानची प्रजा सुखी व संपन्न आहे असें ब्रिटिश मुत्सद्द्याच्या मनांत कोणीं भरवून दिलें असेल तर ती कल्पना सप्रमाण खोडून काढण्याचें दादाभाईनीं मनांत आणिले हिंदुस्थानची लोकसंख्या, लोकाची मिळकत, व्यापार, शेती, सरकारी कर, तेथील लोकांस खाण्यास लागणारे पदार्थ, साधारण मनुष्यास अवश्य लागणाऱ्या कपड्याचा खर्च, इत्यादि बारीकसारीक गोष्टींची निर्दोष व सांगोपांग माहिती मिळवून त्यांनीं आंकडे तयार केले. इतर युरोपियन, अमेरिकन, आफ्रिकन वगैरे राष्ट्रांतील लोकाची असल्या प्रकारची माहिती मिळवून, या सर्व माहितीच्या आधारानें " हिंदुस्थानचें दारिद्र्य " (Poverty of India) व " हिंदुस्थानची काय गत होणार ? " (Condition of India) हे दोन निबंध सन १८८०मध्यें त्यांनीं प्रसिद्ध केले

मध्यंतरीं, सन १८७६ सालीं, पावसाचें अवर्षण होऊन हिंदुस्थानांत भयंकर दुष्काळ पडला या गोष्टीनें दादाभाईस विशेष विचारग्रस्त केलें. हिंदुस्थानांत पडणाऱ्या दुष्काळांचें खरें कारण केवळ अनावृष्टि किंवा अतिवृष्टि येवढेंच नाहीं, तर बेजबाबदार राज्यपद्धतीकडे याचा बराच दोष आहे अशी त्यांची खात्री झाली होती सन १८७६ सालचा दुष्काळ फारच तीव्र होता, आणि त्याबद्दल इतका बोभाटा झाला कीं, त्यासंबंधीं चौकशी करण्याकरितां सरकारकडून दुष्काळ कमिशन नेमण्यांत आलें हें कमिशन सन १८८० मध्यें बसलें, व या कमिशननें केलेल्या रिपोर्टासंबंधानें एक लेख तयार करून तो दादाभाईनीं सन १८८१च्या जानेवारी महिन्यांत स्टेट सेक्रेटरीकडे पाठविला. तो नटेसनच्या पुस्तकांत परिशिष्ट 'ई' येथें छापला आहे. कमिशननें आपल्या रिपोर्टांत लिहिलें होतें कीं, दुष्काळ

**दुष्काळावरील विचार**

घालविण्याचा उपाय करावयाचा असेल तर इंग्रज लोकांस अधिक नोकऱ्या मोठें मोबदला द्याव्या आणि एक शेतकीखातें काढावें हिंदुस्थानच्या उत्तम राज्यकारभाराबद्दल म्हणून ६,५०,००,००० पौंड प्रतिवर्षी हिंदी लोकांकडून मिळालेच पाहिजेत. परंतु दादाभाईनीं आपल्या लेखात असें दाखविलें कीं, हे उपाय नसून अपाय आहेत, दुष्काळावर खरा उपाय काढावयाचा असेल तर हिंदुस्थानचा द्रव्यशोष थांबवा. कराचें ओझें युनायटेड किंग्डमवर शेंकडा ८ आहे तर हिंदुस्थानावर शेंकडा २२ आहे, आणि पहिल्याचें उत्पन्न १,००,००,००,००० पौंड आहे तर हिंदुस्थानचें उत्पन्न त्याच्या एक तृतीयांशही नाहीं, विलायतेंत सर्व कर तेथल्या लोकांच्या हितासाठीं खर्च होतो, आणि हिंदुस्थानचा सर्व पैसा बाहेरच गडप होतो तेव्हां इतका पैसा नेणारी नोकरशाही थांबवा आणि एतद्देशीय लोकांस मोठ्या पगाराच्या जागा द्या.

सन १८८१ मध्यें दादाभाई पुन्हा मुंबईच्या कार्पोरेशनचे सभासद झाले. हिंदुस्थानचे व्हाइसरॉय लॉर्ड लिटन परत गेले व राज्याचीं सूत्रें लॉर्ड रिपन साहेबांच्या हातीं आलीं या दोन अधिकाऱ्यात विलक्षण फरक होता लॉर्ड रिपन हे फार उदार अतःकरणाचे असून त्याना हिंदुस्थानच्या कल्याणाची फार कळकळ होती यांच्या कारकीर्दीत दादाभाईच्या अतःकरणावर लिटनशाहीमुळें पसरू लागलेली निराशेची छाया बरीचशी दूर झाली ईस्ट इंडिया असोसिएशनची मुंबईची शाखा कमकुवत होऊन जागच्याजागीं थंड पडल्यासारखी झाली होती, तिच्यांत त्यांनीं नवजीवन घातलें सन १८८२ मध्यें लॉर्ड क्रोमर यांनीं जकाती उठविल्यामुळें दादाभाईस फार आनंद झाला, कारण ते स्वतः सरक्षक जकात-पद्धतीच्या विरुद्ध होते. शिवाय, स्थानिक स्वराज्यपद्धतीचा पाया घालण्याचा हिंदुस्थानसरकारकडून विचार सुरू झाल्यामुळें दादाभाईस पुष्कळ आशा वाटू लागली रिपन साहेबांची कारकीर्द सन १८८४ सालीं संपून ते परत जाण्यास मुंबईस आले, तेव्हां त्याच्याविषयींचा आदर व्यक्त करण्यासाठीं मुंबईच्या लोकांची मोठी जाहीर सभा नोव्हेंबरच्या २९ तारखेला झाली त्या सभेंत बोलतांना दादाभाईनीं रिपनसाहेबांची फार प्रशंसा केली, व लाटसाहेबांस 'धर्मात्मा रिपन' (Ripon the Righteous) हें नाव खरोखरच शोभत आहे असें त्यांनीं सांगितलें.

**कॉंग्रेसची स्थापना**

सन १८७६ ते १८७९ ह्या सालांत दादाभाईंच्या मनांत जितका निरुत्साह उत्पन्न झाला होता तितका त्यांचा उत्साह सन १८८२ ते १८८५ सालच्या गोष्टींनीं वाढविला. सन१८८५ मध्यें लॉर्ड रे, मुबईंचे गव्हर्नर, यांनीं दादाभाईंस मुंबईच्या कायदे कौन्सिलाचे सभासद नेमिलें या वर्षी रिपन टेक्निकल स्कूल मुबईस काढण्याच्या कामीं दादाभाईंनीं पुष्कळ मेहनत घेतली या वेळीं त्याचें वय ६० वर्षांचें झालें होतें तीस चाळीस वर्षांपूर्वीं इंग्रजांच्या राज्यपद्धतीवर सर्व लोक भुलून गेले होते, परंतु या वेळीं लोकात बरीच जागृति होऊन त्याची दृष्टि निवळली होती. तेव्हा तिचा फायदा घ्यावा, व राजकीय चळवळ मधून मधून तुटक रीतीनें न चालविता तिला शिस्त लावावी, नाहीं तर इतक्या दिवसाची आपली खटपट वाया जाईल, असें दादाभाईस आता वाटूं लागलें इलबर्ट-बिलाच्या विरुद्ध गोऱ्या लोकानीं केवढी ओरड केली होती ती त्यांनीं इंग्लंडात असतांना पाहिली होती, व त्यावरून हिंदी लोकानीं कशा तऱ्हेनें चळवळ केली पाहिजे याचा त्यानीं अदमास ठरविला होता ते इतर पुढाऱ्यास म्हणत कीं, आपल्या चळवळींत जर काहीं जोम आणि सामर्थ्य आणावयाचें असेल तर नुसती एकट्यादुकट्या प्रांतात खटपट करून भागणार नाहीं, सबद राष्ट्रांतील लोकाच्या इच्छा व भावना एकजीव झाल्या पाहिजेत आणि सर्वांची एकदिलानें चळवळ झाली पाहिजे या त्याच्या विचाराचे मूर्तस्वरूप म्हणजेच १८८५ सालीं झालेली राष्ट्रीय सभेची स्थापना होय. हिच्या अधिवेशनाच्या कामीं दादाभाईंनीं फार परिश्रम केले. या पहिल्या बैठकींत त्यानीं तीन ठरावांवर भाषणें केलीं. ते ठराव असेः—हिंदुस्थानच्या राज्यपद्धतीची चौकशी करण्यासाठीं एक रॉयल कमिशन नेमावें, कायदे कौन्सिलाची वाढ व सुधारणा व्हावी, आणि आय् सी. एस ची परीक्षा इंग्लंडमध्यें व हिंदुस्थानांत, दोन्ही देशात, एकाच वेळीं घ्यावी.

काँग्रेस आटपल्यावर १८८६ मध्यें दादाभाई विलायतेस गेले जुलई महिन्यांत पार्लमेंटची नवीन निवडणूक व्हावयाची होती. पार्लमेंटांत हिंदुस्थानच्या संबंधाच्या प्रश्नांची चर्चा वरचेवर चालू रहाण्यास हिंदुस्थानचा कोणी मनुष्य पार्लमेंटचा सभासद झाल्यास फार फायदा होईल असें दादाभाईस पुष्कळ दिवस वाटत होतें. हें आपलें म्हणणें मुंबई इलाखा सभेच्या (Bombay Presidency Association) एका बैठकींत त्यांनीं सर्वांपुढें मांडलें. राजकीय

बद्दल त्यांना भीति वाटत होती त्यामुळें दादाभाईंस यश येण्याचा संभव फारच कमी होता. शिवाय, त्यांचा प्रतिस्पर्धी कर्नेल डंकन हा द्रव्याचा व इतर दृष्टीं-नींही दादाभाईंपेक्षां फार प्रबल होता. तो आयर्लंडच्या स्वराज्याची थट्टा करणारा असून त्याचा स्थानिक लौकिकही बराच होता. उलट दादाभाईंचें नांवही कांहीं रहिवाशांनीं ऐकलें नव्हतें इतकी प्रतिकूल स्थिति असूनही कर्नेल डंकनला ३६५१ तर दादाभाईंस १९५० मतें मिळालीं दादाभाई पडले ह्यांत विशेष नवल नाहीं. निवडणुकीच्या अगोदर सारे नऊ दिवस तयारीला मिळून लोकांच्या भेटी घेणें शक्य नसल्यामुळें केवळ आठ दहा व्याख्यानांच्या आधारावर दादा-भाईंना सुमारें दोन हजार माणसांचीं मतें मिळालीं हा पराजयसुद्धां भूषणावह होता, असें कोण म्हणणार नाहीं ? त्यांच्या बहुमोल राजकीय चळवळीच्या महत्त्वाची व आपल्या अंगच्या गुणांनीं त्यांनीं इंग्लंडांत मिळविलेल्या कीर्तीची ही एक मोठी साक्ष आहे

यानतर हिंदुस्थानासंबंधाच्या अनेक प्रश्नांवर इंग्लंडमध्यें ठिकठिकाणीं व्याख्यानें देण्यास दादाभाईंनीं सुरुवात केली. अफूचा व्यापार बंद करणारें एक मंडळ लंडन-मध्यें होतें त्याच्या सन १८८६ च्या जून महिन्यातल्या परिषदेस दादाभाईंना आमंत्रण होतें तेथें त्यानीं केलेलें भाषण नटेसनच्या पुस्तकांत पृष्ठें १९२ तें १९८ येथें छापलें आहे त्यात ते म्हणाले कीं, दारूप्रमाणेंच अफूही मादक पदार्थ आहे, व तें विष हिंदुस्थानांत पिकून चिनी लोकांच्या पोटांत जातें ह्याला ब्रिटिश अधिकारी कांहींच उपाय करीत नाहींत, हिंदुस्थानची अफू खपते म्हणून हिंदु-स्थानचा फायदा झाल्यासारखा दिसतो, परंतु मिळकत विलायती व्यापाऱ्यांस होते आणि चीनचें गिऱ्हाईक तयार करावें लागत असल्यामुळें त्याचे शिव्याशाप हिंदुस्थानास मिळतात; यावरून ही राज्यपद्धति सुधारल्याशिवाय हिंदुस्थानचें दारिद्र्य कमी होणार नाहीं, हें उघड आहे.

सन १८८६ मध्यें कलकत्त्यास जी कॉंग्रेस झाली, तिचे अध्यक्ष दादाभाई होते. त्या वेळीं विशेष महत्त्वाचा वाद म्हणजे अगोदर सामाजिक सुधारणा कीं राजकीय हा होता. पहिल्या पक्षाचे अध्वर्यु न्यायमूर्ति महादेव गोविंद रानडे व दुसऱ्या पक्षांत नेटानें कार्य करणारे लोकमान्य बाळ गंगाधर टिळक. ह्या पुढाऱ्यांच्या मतभेदामुळें दोन तट पडण्याची वेळ आली होती त्यामुळें अध्यक्ष या नात्यानें त्या वेळीं दादाभाईंनीं केलेल्या भाषणाचें महत्त्व मोठें आहे. तें

भाषण नटेसनच्या पुस्तकांत पृष्ठें १ ते १९ येथें छापलें आहे. त्यांचें म्हणणें असें होतें कीं, सामाजिक सुधारणेकडे लक्ष न देणारी कॉंग्रेस निरुपयोगी असा दोष लावणें म्हणजे गणितांतील किंवा वेदान्तांतील बिकट प्रश्न हातीं न घेण्याबद्दल कॉमन्स सभेला नांवें ठेवण्यासारखें आहे. सामाजिक प्रश्न जाती व जातींचे पोटभेद यांपुरतेच असल्यामुळें सबंध राष्ट्राच्या सभेपुढें तें मांडणें अप्रासंगिक आहे, आणि म्हणूनच सामाजिक सुधारणाचा विचार राष्ट्रीय सभेनें न केल्यास सामाजिक सुधारणेचें महत्त्व त्या सभेला कळत नाहीं असा अर्थ करणें योग्य नाहीं. दादाभाईसारख्या सामाजिक सुधारकाच्या तोंडचे हे शब्द फार लक्षांत ठेवण्यासारखे आहेत

दादाभाई मुंबईस आले त्या वेळीं त्यानीं पार्लमेंटात शिरण्याची खटपट केली. त्याबद्दल त्यांचें अभिनदन करण्याची मुबईकरास उत्सुकता असूनही कॉंग्रेसचे अध्यक्ष त्यांना व्हावयाचें होतें, त्यामुळें हा विचार लाबणीवर टाकावा लागला, परंतु पुढें सन १८८७ च्या फेब्रुवारी महिन्याच्या १३ व्या तारखेस रविवारीं, दिनशा माणिकजी पेटिट यांच्या अध्यक्षतेखालीं बॉंबे प्रेसिडेन्सी ॲसोसिएशन-तर्फे हें अभिनदन करण्यासाठीं एक सभा बोलावण्यांत आली त्याच सभेंत लालमोहन घोस यांनीं दादाभाईप्रमाणेंच पार्लमेंटमध्यें शिरण्याचा प्रयत्न केल्या-बद्दल त्यांचेही आभार मानण्याचा योग जुळवून आणिला होता त्या वेळीं उत्तरा-दाखल दादाभाईनीं जें भाषण केलें त्यात असें विशेष सागितलें कीं, मला अपयश आलें खरें, परतु माझ्या खटपटीस तेथल्या लोकांनीं जी मदत केली तीवरून हिंदुस्थानच्या राजकीय चळवळीस मदत करणारे इंग्रज लोक आपल्याला मिळतील हें सिद्ध झालें. माझ्या खटपटीमुळें तिकडच्या लोकास हिंदुस्थाना-विषयीं माहिती होऊन कांहींच्या मनांत हिंदी राजकारणाविषयीं आवडही उत्पन्न झाली. माझा प्रयत्न वायां गेला असें मला वाटत नाहीं. हिंदी मनुष्याविषयीं हॉबोर्नच्या लोकांनीं दाखविलेलें प्रेम लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

सन १८८१ मध्यें जॉन क्रॉफर्डसाहेबांनीं आपल्या एका विचित्र लेखांत सर्वोत्कृष्ट गुणांचा मक्ता युरोपस्थ गोऱ्या लोकांच्याकडे घेऊन बुद्धिहीनता, व्यवहारशून्यता, असत्यप्रियता वगैरे दुर्गुणांची मालिका आशिया खंडांतील सरसकट सर्व लोकांच्या गळ्यांत अडकवून असा सिद्धांत काढला होता कीं, पूर्वखंडांतील लोक नादान असल्यामुळें त्यांच्यावर राज्य करण्याचा हक्क

निसर्गानेंच पश्चिम खंडांतील श्वेतवर्णीयांस दिला आहे. या विधानास उत्तर म्हणून दादाभाईंनीं एक निबंध लंडन येथील 'एथ्नॉलॉजिकल सोसायटी' पुढें सन १८८६ च्या २७ मार्च रोजीं वाचला. त्यांत प्रोफेसर म्यॅक्स मुलर, होरेस विल्सन, पोप, रॉलिन्सन वगैरे ऑक्सफर्डसाहेबांच्याच हाडा-मांसाच्या लोकांच्या लेखांचे आधार देऊन त्यांच्या विषमय लेखाचें पूर्ण खंडन केलें तो लेख नटेसनच्या पुस्तकांत पृष्ठें ५३५ ते ५७१ येथें छापला आहे त्याप्रमाणेच सन १८८७ सालीं सर एम् ई ग्रॅंट डफ यांनीं आपल्या एका लेखात असलींच भलतीं विधानें केलीं होतीं. तो लेख दादाभाईंच्या वाचण्यांत आल्याबरोबर त्यांनीं लगेच आगस्ट महिन्याच्या 'कॉन्टेम्पोररी रिव्ह्यू' मध्यें एक लेख लिहून डफसाहेबांचें प्रत्येक विधान पोकळ व मत्सरग्रस्त आहे, असें सिद्ध करून असें म्हटलें होतें कीं, " डफसाहेबांच्या लेखाइतका खेदजनक लेख आजपर्यंत मीं पाहिला नव्हता त्याची भाषा व विचारसरणी इतकी अश्लाघ्य आहे कीं, असल्या सन्माननीय व ज्ञानवृद्ध गणल्या जाणाऱ्या गृहस्थानें हें कसें लिहिलें याचें मला पुनः पुन्हा सखेदाश्चर्य वाटतें ! "

**एशियाटिक लोकांची तरफदारी**

हिंदुस्थानासबंधानें ज्या चार पाच गोष्टींबद्दल दादाभाईंनीं फार खटपट केली त्यातील पहिली म्हणजे हिंदुस्थानच्या लोकास मोठ्या पगाराच्या जागा देणें ही होय. सन १८५९ सालीं या संबंधींच्या भांडणापासूनच त्यांच्या राजकीय चळवळीला प्रारंभ झाला. प्रथम सिव्हिल सर्व्हिस परिक्षेच्या नियमातील अन्यायाबद्दल तक्रार करण्यात दादाभाईंचीं दोन वर्षे गेलीं. सन १८६८ मध्यें 'सुशिक्षित हिंदी लोकांचा सिव्हिल सर्व्हिसमध्यें प्रवेश' या विषयावर त्यांनीं एक निबंध स्टेट सेक्रेटरीकडे पाठविला, व त्या संबधाच्या सर स्टॅफोर्ड नॉर्थकोट यांच्या मतांचें खंडन करणारें एक निबंधात्मक पत्र त्यांस पाठविलें. राष्ट्रीय सभा सन १८८५ सालीं स्थापन झाल्यापासून दर वर्षी या विषयावर एक ठराव करून तो सरकारकडे पाठविण्याचा क्रम त्यांनीं चालू केला. हिंदुस्थानचें दारिद्र्य जाऊन सौख्य प्राप्त होणें हें सर्व या विषयाच्या निकालावर अवलबून आहे असें त्यांना वाटत असे. म्हणून पब्लिक सर्व्हिस कमिशननें ज्या साक्षी घेतल्या त्यांत त्यांची साक्ष महत्त्वाची आहे. ती नटेसनच्या

**पब्लिक सर्व्हिस कमिशनपुढील साक्ष**

पुस्तकात परिशिष्ट 'क' येथें छापली आहे. तींत ते म्हणतात कीं, जातिभेद व वर्णभेद मनांत न आणतां प्रजेला सारख्या दृष्टीनें वागविणें हा ब्रिटिश राज्याचा पाया आहे या तत्त्वापासून ब्रिटिश मुत्सद्दी जितके परावृत्त होतील, तितक्या मानानें राज्यास कमकुवतपणा येणार आहे./ यासाठीं आय् सी एस्. परीक्षा दोन्ही देशांत घेणें अवश्य आहे. त्या पासून हिंदुस्थानातील अप्रतिम पुरुषाच्या गुणांचें चीज होईल, एकदर शिक्षणाचें धोरण उच्चतर होईल, विलायतचा खर्च, नीति बिघडण्याचा संभव वगैरे कारणानीं मुलें विलायतेंत पाठविण्याच्या वेळीं पालकांना जी भीति वाटते ती दूर होईल, सरदार व जहागीरदार याच्यापैकीं योग्य सुशिक्षितास सरकारनें नोकरींत घेतल्यास सलोखा उत्पन्न होऊन फार फायदा होईल, बिनसनदी नोकरींतील योग्य माणसाचा पगार सनदी नोकरांप्रमाणेच ठेवावा, हिंदुस्थानात परिक्षा घेण्यास विलायतेप्रमाणें येथेंही सिव्हिल सर्व्हिस कमिशन स्थापावें, व सिव्हिल सर्व्हिस परिक्षेंत नापास झालेला एखादा उमेदवार फार बुद्धिवान् दिसल्यास त्यास बिनसनदी नोकरींत जागा द्यावी

सन १८८७ च्या जुलई महिन्यात ईस्ट इंडिया ॲसोसिएशनच्या एका सभेपुढें ए के. कोनेल यानीं एका निबंधात वरिष्ठ दर्जाच्या नोकऱ्यासंबंधीं हिंदुस्थानच्या मागणीची थट्टा केली. अध्यक्ष जॉन ब्राइट यांच्या परवानगीनें दादाभाई त्या वेळीं उत्तर देण्यासाठीं उठले ते म्हणाले, " हा प्रश्न हिंदुस्थानातल्या मूठभर सुशिक्षित लोकांच्या आकांक्षेचा नसून, हिंदुस्थानच्या जीवनाचा व पोटापाण्याचा हा प्रश्न आहे. हिंदुस्थानावर इंग्रजाचें राज्य शंभर वर्षे असूनही तो देश दरिद्री व मागासलेला कां आहे याचा उलगडा यांत आहे. इंग्रज अधिकाऱ्यांच्या खिशांत विनाकारण जाणाऱ्या पैशाचा ओघ थांबवा म्हणजे हिंदुस्थानची संपन्नता वाढेल तुम्ही इंग्रज न्यायी, धीट व स्पष्टवक्ते आहां, मग अशीं उडवाउडवीचीं उत्तरें कां देता ? तुमच्यावर आम्ही असाच जुलूम करणार असें आम्हास कां सांगून टाकीत नाहीं ? आश्वासनांची व जाहीरनाम्यांची लाज धरा, आणि हिंदुस्थानांतील राज्याचें सामर्थ्य तोफांच्या गोळ्यांत किंवा समशेरीच्या धारेंत नसून लोकांच्या संतोषांत आहे, हें विसरूं नका."

सन १८८६ मध्यें होबोर्न परगण्यातर्फे निवडून येण्याबद्दल दादाभाईंनीं कशी खटपट केली व त्यांत जरी अपयश आलें तरी त्या वेळीं लोकांनीं केलेल्या वाहाव्याच्या अजमासावरून पुन्हा खटपट करण्याचा त्यांचा निश्चय कसा कायम

झाला होता, हें मागें सांगितलेंच आहे कधींही निराश न होणें, हा तर दादाभाईंच्या स्वभावांतील एक विशेष होता म्हणून सन १८९२ सालच्या निवडणुकीच्या वेळीं सेंट्रल फिन्सबरीतर्फे ते पुन्हा उभे राहिले. ह्यूम, वेडरबर्न यांची मदत होतीच या वेळीं दादाभाईंनीं अगोदरपासूनच मतदारांच्या भेटी घेण्याचा सपाटा सुरू केला. मतदार घरीं न भेटला तर त्याच्या बायकोशीं गोष्टी बोलून हिंदुस्थानची सुधारणा करणें इंग्रजांचें कर्तव्य आहे, याबद्दल तिची समजूत घालावयाची व ती आपल्या नवऱ्याचें मत आपल्याला मिळवून देईल अशी तिच्यावर छाप पाडावयाची अशी मोहीम या वेळीं दादाभाईंनीं सुरू केली घरोघर हिंडून, व्याख्यानें देऊन प्रमुख व वजनदार लोकांच्या गांठी घेऊन आपली माहिती सर्वांस करून देणें, आपलीं मतें उघड स्पष्ट सांगणें, आपण निवडून आल्यास साम्राज्याचा कसा फायदा होईल हें दाखविणें, या कामांत दादाभाई अगदीं गढून गेले या प्रसंगाविषयीं पुढें एकदां बोलतांना सर वेडरबर्न म्हणाले, "इतक्या म्हातारपणीं केवळ आपल्या देशाच्या हितासाठीं रात्रंदिवस मेहनत करणाऱ्या दादाभाईंस पाहून माझें अंतःकरण कौतुकानें व आनंदानें भरून येई."

**पार्लमेंटांत शिरण्याचा पुन्हा प्रयत्न**

या वेळच्या निवडणुकींत दादाभाईंस विजयश्रीनें माळ घातली. त्यांच्या यशाबद्दल स्वतः त्यांना व त्यांच्या देशबांधवांना आनंद झाला हें साहजिक होय; परंतु त्यांच्याबद्दल विलायतच्या लोकांतही इतका आदर उत्पन्न झाला कीं, कित्येक मोठमोठ्या इंग्रज अधिकाऱ्यांकडून त्यांस अभिनंदनपर संदेश आले. हिंदुस्थानात ठिकठिकाणीं सभा होऊन दादाभाईंचें अभिनंदन करणारे ठराव पास करण्यांत आले. दादाभाईंच्या जयाबद्दल आनंद प्रदर्शित करण्यासाठीं सन १८९२च्या जुलैच्या २३तारखेस मुंबईच्या टाऊनहॉलमध्यें सर दिनशा माणेकजी पेटिट यांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या नागरिकांच्या सभेंत बोलतांना फेरोजशहा मेथा म्हणाले कीं, राजकीय युद्धाचें खरें क्षेत्र पार्लमेंट आहे आणि हिंदुस्थानच्या हितसंबंधाच्या विषयांवर तेथें वादविवाद होण्याचें साधेल तर आपल्या राजकीय चळवळीचें पाऊल झपाट्यानें पुढें पडेल, असें म्हणणारे दादाभाई पार्लमेंटांत शिरले याबद्दल आम्हां सर्वांना अत्यानंद होत आहे.

हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेसंबंधींच्या प्रश्नांकडे सर्व मुत्सद्यांचें लक्ष सारखें वेधून ठेवावयाचें आणि ज्या कांहीं मागण्या आपणांस करावयाच्या असतील त्याविषयींचे

ठराव पार्लमेंटमध्यें आणावयाचे या मुख्य उद्देशानें दादाभाई निवडणुकीला उभे राहिले. निवडणुकींत यशस्वी झाल्याबरोबर त्यांनीं आपल्या योजलेल्या कामगिरीला प्रारभ केला पूर्वी सागितलेंच आहे कीं, हिंदुस्थानांतील वरिष्ठ नोकऱ्या इग्रज लोकानीं व्यापून टाकल्या आहेत हेंच हिंदुस्थानच्या सर्व दुःखाचें मूळ कारण होय. अशी दादाभाईची खात्री होती. एकदां या सर्व जागांवरून इग्रज नोकर काढून टाकले व हिंदी लोक तेथें आले कीं, मग हिंदुस्थानच्या दारिद्र्याचा प्रश्न आपोआप सुटेल, हिंदुस्थानच्या दुष्काळावर उपाय शोधण्याचें कारण उरणार नाहीं हिंदुस्थानची शेती सुधारेल, शिक्षणप्रसार होईल–सर्व कांहीं सुरळींत चालावयास लागेल, असा त्यांचा विश्वास होता. To Indianise all services हें पायाभूत कार्य आहे असें दादाभाई म्हणत म्हणूनच पार्लमेंटमध्यें शिरल्याबरोबर सिव्हिल सर्व्हिस परीक्षेचा प्रश्न त्यानीं हातीं घेतला. या परीक्षेच्या बाबतींत हिंदी लोकांवर केवढें अन्यायाचें ओझें लादले आहे याविषयीं पूर्वी अनेक वेळा त्यानीं व्याख्यानें दिलीं होतीं, व स्टेट सेक्रेटरीसारख्या मोठमोठ्या अधिकाऱ्यांशीं पत्रव्यवहारही केला होता. परंतु आतां नुसत्या व्याख्यानांनीं काम भागण्यासारखें नव्हतें, कारण सिव्हिल सर्व्हिस परीक्षा हिंदुस्थानांत व इंग्लडमध्यें घेण्यात यावी असा ठराव पार्लमेंटपुढें मांडण्याचा दादाभाईचा बेत होता एखादा ठराव पार्लमेंटमध्यें आला कीं, त्यावर प्रत्येक सभासदाचें मत घ्यावयाचें असतें तो ठराव पास व्हावा अशी आपली इच्छा असेल तर शक्य तितक्या सभासदांचें मत अनुकूल करून ठेवणें जरुरीचें असतें. दादाभाईनीं पहिली धूर्तपणाची गोष्ट ही केली कीं, हा ठराव आपण स्वतः पुढें न मांडतां कोणा तरी इंग्रज सभासदाकडून तो पुढें आणावयाचें ठरविलें हिंदी माणूस हिंदुस्थानच्या हिताविषयीं बोलू लागला तर हा स्वार्थप्रेरित दृष्टीनें बोलत आहे असें लोकांस वाटेल, आणि इंग्रज मनुष्य हिंदुस्थानच्या हिताच्या प्रश्नाची चर्चा करूं लागला तर त्याचें म्हणणे न्यायाचें व निःपक्षपातीपणाचें आहे असें सर्वांस वाटेल, असा विचार करून हा समकालीन परीक्षांचा ठराव पार्लमेंटपुढें मांडण्याविषयीं दादाभाईनीं हर्बर्ट पॉल यांचें मन वळविलें. शिवाय त्यांनीं पुष्कळ पार्लमेंट सभासदांची भेट घेतली, व सिव्हिल सर्व्हिस परीक्षा हिंदुस्थानांत होणें किती नैसर्गिक, न्याय्य व जरुरीचें आहे तें त्यांस समजावून सांगितलें. कोणत्याही देशांत बुद्धिमान् माणसें गरीब कुळांतच निपजत असल्याकारणानें हीं बुद्धिमान् माणसें बारिस्टर होऊन

पोंचवावयाची असल्यास त्यांची गरिबी त्यांच्या आड येतां कामा नये, आल्य त्यांत देशाचें नुकसान आहे, व इंग्लंडांतील परीक्षेला बसणें हुषार पण ग हिंदी विद्यार्थ्यांस अशक्य असल्यामुळें हिंदुस्थानचें अपरिमित नुकसान आहे, वगैरे गोष्टी सप्रमाण सिद्ध करून दाखविण्यासाठीं अनेक पार्लमेंट सभासद त्यांनीं खाजगी वादविवाद केला शेवटीं ता. २ जून १८९३ सालच्या प मेंटच्या बैठकींत पॉल यांनीं हा समकालीन परीक्षांचा ठराव सभेपुढें मांड त्या वेळचे अंडर सेक्रेटरी जॉर्ज रसेल यांनीं त्या ठरावास विरोध केला. पुष्ट चर्चा झाली, उत्तरें प्रत्युत्तरें झालीं शेवटीं मतें घेण्यांत आलीं व ठराव पास झा

मताधिक्यानें ठराव पास झाला तरी दादाभाईस काळजी वाटत होती. क या ठरावास स्टेट सेक्रेटरी लॉर्ड किंबर्ली व अंडर सेक्रेटरी जॉर्ज रसेल हे दो प्रतिकूल होते. हिंदुस्थानविषयक प्रश्नांचा निकाल पार्लमेंटच्या ठरावांपेक्षां ठराव अमलांत आणण्याची इंडिया गव्हर्मेंटला आज्ञा करणाऱ्या स्टेट-सेक्रे च्या मतावरच अधिक अवलंबून असतो, हें दादाभाईस माहीत होतें. म्ह त्यांस असें वाटूं लागलें कीं, ठराव पार्लमेंटांत पास झाला खरा, परंतु त्य अंमलबजावणी करणारे स्टेट सेक्रेटरी पुढें काय करतील कोण जाणे! संशयानें दादाभाईस फार काळजी वाटूं लागली शेवटीं, लॉर्ड किंबर्ली य दादाभाईस कळविलें कीं, "जरी मी स्वतः या ठरावाविरुद्ध होतों, तरी ठरावाच्या अंमलबजावणीवर मी माझ्या मताचा यत्किंचितही परिणाम देणार नाहीं. मीं तो ठराव हिंदुस्थानसरकारकडे पाठविला आहे." लॉर्ड किं यांच्या या आश्वासनानें दादाभाईस धीर आला, व हातीं घेतलेलें कार्य ब करून यशस्वी होईल अशी आशा त्यांस वाटूं लागली.

सन १८९३ सालची नववी राष्ट्रीय सभा लाहोर येथें भरणार होती. अध्यक्षस्थान स्वीकारण्याची दादाभाईस विनंति करण्यांत आली. मेंटचे सभासद झालेले पहिले हिंदी गृहस्थ या दृष्टीनें हिंदी लोक दादाभाईविषयीं फारच कौतुक वाटत होतें व अशा या लोकोत्तर पुढाऱ्यानें वर्षाच्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्ष व्हावें अशी सर्वांची उत्कट इच्छा होती. इच्छेला मान देऊन दादाभाई ताबडतोब हिंदुस्थानांत आले, व लाहोर कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान त्यांनीं सुशोभित केलें.

कॉंग्रेसचें कार्य कोणत्या रीतीनें सुलभ होईल व कॉंग्रेसनें कोणत्या धुरा

साठीं तावडतोब चळवळ सुरू केली पाहिजे हें दादाभाईंनीं या वेळच्या भाषणांत सांगितलें, व या दृष्टीनें हें भाषण महत्त्वाचें आहे ते म्हणाले, ( पृष्ठें २० ते ६४, नटेसन २ री आवृत्ति ) " आपल्या देशाच्या सांपत्तिक व

**पुन्हा कॉंग्रेसचे अध्यक्ष**

राजकीय स्थितीसंबंधीं अजून पुष्कळ गैरसमज आहे व तो दूर केल्याशिवाय आपला मार्ग सुलभ होणार नाहीं परंतु कॉंग्रेसचा मार्ग सोपा नसला तरी स्पष्ट आहे सध्यां अगदीं आवश्यक अशी सुधारणा म्हणजे आमच्या कायदे कौन्सिलांची पैशाच्या खर्चाच्या बाबतींत हीं कौन्सिलें असून नसल्यासारखीं आहेत एखाद्या खात्यानें कांहीं गैर खर्च केला तर त्या खात्याची झडती घेण्याची संधि या कौन्सिलांस मुळींच नाहीं. त्याप्रमाणेंच हिंदुस्थानच्या बजेटाविषयीं कांहीं तरी योक्त विचार झाला पाहिजे. ग्रेटब्रिटनचें बजेट तयार व्हावयाच्या वेळीं हाउस ऑफ कॉमन्समध्यें आठ-वडेच्या आठवडे ऊहापोह चालतो. आणि इकडे हिंदुस्थानात फडणिसांनीं बजेट सादर करावयाचें आणि ज्या भाषणामुळें बजेटात काडीइतकाही फेरफार होत नाहीं अशीं कांहीं भाषणें व्हावयाचीं कीं बजेटाच्या विचाराचा फार्स संपला."

यानंतर, इंग्रजी शिक्षणामुळें हिंदुस्थानांत सुशिक्षित असा जो वर्ग तयार झाला आहे त्याची सरकारनें अवहेलना न करतां राज्यकारभारांत मदत घेतली पाहिजे. इतकीं वर्षें हिंदुस्थानांत इंग्रजी सत्ता असूनही हिंदुस्थानात दारिद्र्य असावें ही शोचनीय गोष्ट आहे. हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचा निम्मा खर्च विलायत-सरकारनें दिला पाहिजे. न्यायखातें व अंमलबजावणीखातें हीं निरनिराळीं असलीं पाहिजेत, वगैरे सांगून दादाभाई म्हणाले—

" इंग्रज जनतेचा मला जो अनुभव आला त्यावरून मी अशी आग्रहाची विनंति करतों कीं, लवकर केव्हां तरी कॉंग्रेसनें आपली एक बैठक इंग्लंडमध्यें करावी. असा रीतीनें अगदीं त्यांच्या घरांत जाऊन इंग्रज जनसमाजास आपलें गाऱ्हाणें सांगितलें, तर हिंदी लोकांविषयीं त्यांच्या मनांत अधिक सहानुभूति उत्पन्न होऊन, त्यापासून अतिशय फायदा होईल अशी माझी खात्री आहे."

कॉंग्रेस संपल्यावर दादाभाई इंग्लंडला गेले व पार्लमेंटमधील कामांत त्यांनीं लक्ष घातलें.

सन १८९४ सालीं ऑगस्ट महिन्यांतील १४ तारखेस जी पार्लमेंटची बैठक झाली तीमध्यें "पार्लमेंटनें हिंदुस्थानच्या स्थितीबद्दल सर्वांगीण व स्वतंत्र चौकशी

करावी' अशी सूचना दादाभाईंनीं पुढें मांडली त्या वेळीं दादाभाईंनीं जें भाषण केलें, त्यावरून इंग्रज मुत्सद्दयांनींच काढलेल्या उद्गारांचा व लिहिलेल्या लेखांचा आधार घेऊन इंग्रज सरकारच्या पदरांत चुकांचें माप घालण्याची हातोटी दादाभाईंना कशी साधली होती हें स्पष्ट दिसून येतें. ते म्हणाले, ( पृष्ठें १२४ ते १४९, नटेसन २ री आवृत्ति ) " इंग्रजी राज्यामुळें हिंदुस्थानला

**पार्लमेंटमधील पहिलें भाषण**

अगणित फायदे झाले आहेत. ते मी नाकबूल मुळींच करीत नाहीं परंतु हल्लीं ज्या पद्धतीनें हिंदुस्थानचा कारभार पाहिला जात आहे, ती पद्धति हिंदुस्थानची अनेक दृष्टींनीं हानि करीत आहे प्रथमतः बंगालसरकारच्या दप्तरांतील व डिरेक्टरांच्या खलित्यांतील काहीं उतारे मी आपणास वाचून दाखवितों सन १७६५ च्या आपल्या खलित्यात लॉर्ड क्लाइव्ह लिहितात कीं, 'इंग्रज अधिकारी हिंदी रयतेवर जुलूम करून वाटेल तसा पैसा उकळतात' सन १७८७ सालीं सर जॉन शोअर हे लिहितात, 'इंग्रजी राज्यामुळें हिंदी लोकांचें कितीही कल्याण होत असलें तरी त्याच्या होणाऱ्या भयंकर नुकसानापुढें त्या फायद्याची कांहींच किंमत नाहीं. परकी सत्तेच्या हाडींमासीं हे दुष्परिणाम खिळलेले असावयाचेच." सन १७९० सालीं लॉर्ड कॉर्नवॉलिसनीं असे उद्गार काढले आहेत कीं, 'हिंदुस्थानांत कंपनीनें जें द्रव्यशोषण चालविलें आहे त्यामुळें देशाच्या शेतीला व व्यापाराला जबर धक्का पोंचत आहे'. सन१८२३ मध्यें सर टॉमस मनरो यांनीं बजाविलें कीं, 'हिंदी राज्यकारभारात त्या लोकांचा मुळींच हात नाहीं ही अगदीं अनिष्ट गोष्ट होय'. मेकॉलेसाहेबांनीं लिहिलें आहे कीं, 'नेटिव्ह लोकांना पिळून काढण्याखेरीज कंपनीचे नोकर दुसरें काहीं करीत नाहींत' आणि सन १८३३ सालच्या जाहीरनाम्यावर बोलतांना ते म्हणाले, 'कोट्यावधि लोकांना सर्वदा दास्यत्वांत ठेवण्याच्या हेतूनें राज्यशकट हांकणारे उटावरले शहाणेच म्हणावयाचे'. बंगाल सिव्हिल सर्व्हिसमधील फ्रेड्रिक शोअरसाहेबांनीं सन१८३७सालीं असें मत दिलें कीं, 'हिंदुस्थानच्या संपत्तीचें उत्सर्जन पाहवत नाहीं ब्रिटिशसरकारचें धोरण अत्यंत जुलमाचें व दडपशाहीचें आहे. आम्हीं राज्यकारभारांत अधिक उदार दृष्टि ठेवली तरच आमच्या सत्तेचा पाया अधिक मजबूत होईल'. सन १८५८ सालीं पार्लमेंटमध्यें भाषण करतांना ब्राइटसाहेबांनीं सांगितलें, 'आतां यापुढें मूठभर इंग्रजांच्या फायद्यासाठीं हिंदुस्थानचें राज्य चालविण्याचें आपण सोडून दिलें पाहिजे.

इंग्लंडचें हित झालें पाहिजे हें खरें. परंतु हिंदुस्थानचें हित झाल्याशिवाय इंग्लंडचें हित साधणार नाहीं'. हिंदुस्थानांतील करग्रहणपद्धति अगदीं चुकीची आहे हें सर जॉर्ज विंगेट यांनीं दाखविलें; व सन१८६८ मध्यें लॉर्ड मेटकफ साहेबांनीं त्यांच्या म्हणण्याला दुजोरा दिला. सन १८८१ त लॉर्ड सॅलिस्बरींनीं हिंदुस्थानचें धनरूपी रक्त कसें अव्याहत वाहात आहे तें दर्शविलें सन१८८३मध्यें लॉर्ड हार्टिंगटननीं आपलें मत सांगितलें कीं, 'विद्वान् व कर्तबगार नेटिवांना मोठमोठ्या अधिकाराच्या जागा दिल्याखेरीज हिंदुस्थानचें राज्य सुखासमाधानाचें होणार नाहीं. आणि सन१८८६सालीं तिजोरीखात्याला लिहिलेल्या आपल्या पत्रांत प्रत्यक्ष स्टेट सेक्रेटरी म्हणतात कीं, 'हिंदुस्थानावरील करभार सारखा वाढत आहे यामुळें ब्रिटिश राज्यावर मोठें संकट येण्याचा संभव आहे, पण हें येथील इंग्रजांना कळत नाहीं याला काय करावें !'

" या उताऱ्यांवरून आपली खात्री पटेल कीं, हिंदुस्थानच्या हालांचें मी कल्पनाचित्र काढीत नाहीं, किंवा हिंदुस्थानांतील रयतेच्या पुढाऱ्यांचें एकतर्फी गाऱ्हाणें मी सांगत नाहीं युरोपिअन व ॲंग्लो-इंडियन मुत्सद्द्यांच्याच मतें सध्यांची ब्रिटिश राज्यपद्धति सदोष ठरत आहे. हिंदी पैसा वाटेल तसा वापरला व उधळला जात आहे, आणि ब्रिटिश राज्यामुळें हिंदी लोकांचा अनेक तऱ्हांनीं नाश होत आहे हें ब्रिटिश सत्तेला कांहीं सुचिन्ह नव्हे. एक तर, पूर्वीच्या वैभवाच्या मानानें पाहतां हल्लींचा हिंदुस्थान म्हणजे भिकाऱ्याचा देश होऊन बसला आहे दुसरी गोष्ट व्यापाराची कांहीं इंग्रज मुत्सद्द्यांना वाटतें, हिंदुस्थानांत केवढा अवाढव्य व्यापार चालला आहे, तेव्हां त्या देशाची चांगलीच भरभराट होत असली पाहिजे. परंतु हें विधान अगदीं भ्रामक आहे कारण, सर्व युरोपिअन राष्ट्रांत व वसाहतींमध्यें निर्गत मालापेक्षां आयात माल किती तरी अधिक असतांना हिंदुस्थानांत निर्गतापेक्षा आयाताची किंमत सतरा कोट रुपयांनीं प्रत्येक वर्षी कमी असते. हिंदुस्थानची संपत्ति अशी सारखी बाहेर गेली तर कसें होईल ! आम्हांला सांगण्यांत येतें कीं, लोकोपयोगी कामांसाठीं सरकार आम्हांला कर्ज देतें व याबद्दल आम्हीं सरकारचे उपकार स्मरले पाहिजेत. पण यावर माझें असें उत्तर आहे कीं, ब्रिटिश देखरेखीबद्दल थोडें भाडें देऊन आमचा आम्हीं कारभार चालविला तर आम्हांला असें कर्ज काढावयाची वेळच येणार नाहीं. शिवाय, आमचे क्रोडो रुपये नेऊन आम्हांला एखादा हजार कर्जाऊ दिलात तर त्यांत

तुमचे उपकार कसचे? पुष्कळ ब्रिटिश लोक म्हणतात कीं, हिंदुस्थानांत लाखो रुपयांचें भांडवल वापरलें जात आहे तेव्हा हिंदुस्थान श्रीमंत असला पाहिजे पण हें जगी भांडवल हिंदुस्थानचें नव्हे एकट्या मुबईशहरात युरोपिअन लोकांचें दह कोट पौंडाचें भांडवल गुंतलें आहे हीं परकीं भांडवलें वगळलीं म्हणजे हिंदुस्थान केती दरिद्री झाला आहे तें दिसून येईल आमच्यावर जे युरोपिअन अधिकारी आणून ठेवितां त्याच्या पायीं आमचा अगणित पैसा विनाकारण खर्च होतो या साहेबाच्या प्रीत्यर्थ हिंदुस्थानच्या तिजोरीला दरवर्षी २० कोट रुपयांचा खड्डा बसत आहे. शिवाय या सिव्हिल सर्व्हंटांचा आम्हांला उपयोग होत नाहीं तो नाहींच. कारण, आपल्या सत्तेची कारकीर्द चालवून हिंदुस्थानच्या एकंदर स्थितीचें त्या अधिकाऱ्यांना जें ज्ञान प्राप्त होत आहे तों ते पेन्शन घेऊन विला यतेस प्रयाण करतात. त्यानीं मिळविलेला शहाणपणा त्यांच्या बरोबरच इंग्लंडला जाऊन बसतो, व हिंदुस्थानावर पुन्हा अननुभवी माणसाची नेमणूक होते. बरें अधिकाराच्या जागीं ठेवण्यास लायक असे जे नेटिव्ह असतात त्यांना या युरो पेयन अधिकाऱ्यांमुळें एकदम खो बसतो, आणि आमच्यांतील कर्तबगार माणसें कोठें तरी कोनाकोपऱ्यांत कुजत पडतात आपली हुषारी दाखवून जगापुढें येण्याची त्यांना संधि मिळेल तर शपथ अशा प्रकारें युरोपिअन सिव्हिल सर्व्हंटां कडून कारभार चालविण्याच्या तुमच्या पद्धतीमुळें आम्हांला संपत्ति, अनुभव आणि कर्तबगारी या तिहींनाही मुकावें लागलें.

"कोणी म्हणतात, हिंदुस्थानावर कराचें ओझें सर्व देशांपेक्षा कमी आहे. इंग्लंड मध्यें, आयर्लंडमध्यें व वेल्समध्यें कराचें प्रमाण दर माणशीं ४० रु. १० आणे आहे आणि हिंदुस्थानांत तेंच प्रमाण ६ आणे आहे. हें पाहून कित्येकांना वाटतें कीं, काय हें! हिंदुस्थानाला मुळींच कर द्यावा लागत नाहीं म्हटलें तरी चालेल! पण ज्या मंडळींना हें आश्चर्य वाटतें त्यांना माझें असें विचारणें आहे कीं, नुसत्या कराच्या रकमेवरून कराचा हलकेपणा किंवा भारीपणा अजमावयाचा असतो काय? दर माणशीं मिळकत किती आहे हेंही त्याबरोबरच पहावयास नको काय? तुमच्या इंग्लंडमध्यें प्रत्येक माणसाची प्राप्ति सरासरीनें ७०० रु. असते व त्याला ४० रु. कर द्यावा लागतो. उलट गरीब हिंदुस्थानांत दरमाणशीं कर सहाच आणे आहे खरा; पण दर माणशीं प्राप्ति सारी २० रु. आहे, याची वाट काय? या दृष्टीनें विचार केल्यास कराचें प्रमाण इंग्लंडमध्यें शेंकडा ७ व हिंदु

स्थानांत शेंकडा ११ पडतें. हिंदुस्थानावर कर फार कमी आहे, असें आतां कोणता सुज्ञ मनुष्य म्हणेल ? हिंदुस्थानांतील मुलकी खातें ज्या धर्तीवर चालविलें आहे तीमुळें देशाचें अतोनात नुकसान होत आहे जमीनमहसूल, मिठावरील कर व अबकारी खात्याचें उत्पन्न या हिंदी जनतेकडून घेतल्या जाणाऱ्या पैशापैकीं अगदींच लहानशी रक्कम त्यांच्या देशाच्या सुधारणेकडे खर्च होते. वसूल करण्याच्या पद्धतीही अगदीं विचित्र व अस्वाभाविक असून जुलमाचा व दडपशाहीचा तर कांहीं बाबतींत कळस झालेला दिसतो.

अशा एक ना दोन अगणित गोष्टी दाखवितां येतील सारांश इतकाच कीं, ज्या पद्धतीनें हिंदी राज्यकारभार चालला आहे, त्या पद्धतीचा त्याग करा. तिच्यांत सुव्यवस्थित सुधारणा केल्याशिवाय भागणार नाहीं आम्हाला ब्रिटिश राज्य नको आहे असें कोणीही समजू नये परंतु हल्लींसारखी बेजबाबदार राज्यपद्धति आम्हांस खचित नको. न्याय, विश्वास आणि परस्पर आदर यांजवर उभारलेला कारभार आम्हास पाहिजे आहे इंग्रजानीं आम्हांला वेळोवेळीं आश्वासनें दिलीं आहेत कीं, हिंदी जनतेला सुसंस्कृत करून त्यांचें सर्व बाजूंनीं कल्याण करावयाचें हेंच ध्येय आमच्यापुढें आहे सन १८३३ सालच्या चार्टरानें हिंदी लोकांना असें सांगितलें आहे कीं, न्याय व समानता हे ब्रिटिश राज्याचे मूळ आधार आहेत राणीच्या जाहीरनाम्यात हिंदी लोकांच्या सर्व आकांक्षा तृप्त करण्याचें स्पष्ट अभिवचन आहे ईश्वरानें हिंदुस्थान देश आमच्या हवालीं केला आहे असें आम्ही समजतों, व एखाद्या पवित्र ठेवीप्रमाणें त्या देशाचा कारभार पाहून त्याचा सदैव उत्कर्ष व्हावा असा आम्ही सारखा प्रयत्न करूं, असे उद्गार बादशाही मुखांतून आम्हीं अनेक वेळा ऐकले आहेत पार्लमेंटमध्यें अशाच अभिवचनांचा उच्चार पुनः पुन्हा झालेला आहे. परंतु हिंदुस्थानांतील अधिकारी बेइमान होऊन या पवित्र वचनांना काळें फांशीत आहेत. या वचनांवर आम्ही विश्वास ठेवीत आलों आहों, तेव्हा हीं वचनें म्हणजे केवळ धूर्त व कपटी राजनीतिविशारदांचे डावपेंच आहेत असा आम्हांला संशय येण्यासारखें वर्तन इंग्रज मुत्सद्यांनीं करूं नये. गेलीं साठ वर्षें 'दास्यविमोचनाचीं' असल्यामुळें चिरस्मरणीय आहेत, असें इंग्रज मुत्सद्दी म्हणतात; परंतु हिंदुस्थानांत या दास्यविमोचनाचा मागमूसही नाहीं. एकीकडे तीस लक्ष आयरिश लोकांवरील परकी सत्तेचीं बंधनें काढून, त्यांचे हक्क

त्यांना देऊन त्यांची मुक्तता करण्याचा यत्न करतां, आणि दुसरीकडे, तीस कोटी हिंदी लोकांच्या गळ्याभोंवतालचे गुलामगिरीचे पाश अधिक निष्ठुरतेनें आवळतां, या उलट्या न्यायाला हसावें कीं रडावें ? सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा इंग्लंडमध्यें व हिंदुस्थानांत एकदम घेण्याच्या सूचनेला फेंटाळून लावून आमच्या पायातील दास्यत्वाच्या शृंखला अधिक दृढ मात्र केल्यात ! हिंदुस्थान दिवसें-दिवस इतका दरिद्री होत चालला आहे कीं, आणखी कांहीं वर्षें अशींच लोटलीं तर काय होईल याची कल्पनाच करवत नाहीं बहुतेक लोकाना पोटभर अन्नासाठीं रक्ताचें पाणी करावें लागतें फार काय सांगावें-इंग्लंडमधला मनुष्य केवळ दारूसाठीं जितका पैसा खर्च करतो तितका देखील हिंदुस्थानातील माणसाला उदरनिर्वाहासाठीं मिळत नाहीं

हिंदुस्थानच्या प्रजेकडून वसूल होणारा पैसा वाटेल तसा खर्च होत आहे, तिकडे कोणी लक्ष देत नाहीं, युरोपियन व युरेशियन लोक अनेक प्रकारें आमचा पैसा घशाखालीं घालीत आहेत, युरोपियन अधिकाऱ्यांचे पगार पाहिले कीं जीव दडपून जातो व्हाइसरॉयला ५०००० रुपये वार्षिक पगाराची काय जरूर आहे ! साधा चरितार्थ चालवून कुटुंबपोषण करावयास इतक्या पगाराची मुळींच आवश्यकता नाहीं गव्हर्नराना मीठ भाकरी खावयासाठीं २०००० रुपये लागतात कीं काय ? हिंदुस्थानांत असणाऱ्या सर्व गोऱ्या व काळ्या सैनिकांच्या खर्चांचा बोजा हिंदुस्थानच्या माथीं आहे तो काय म्हणून ? खरें म्हटलें असतां या सैनिकांचा हिंदुस्थानच्या संरक्षणार्थ काडीइतका देखील उपयोग होत नाहीं बड्या पगारांचें हें विलक्षण प्रमाण पाहून व सैन्याप्रीत्यर्थ हिंदी तिजोरींतून निघणाऱ्या मोठमोठ्या रकमा पाहून तीन स्टेट सेक्रेटरींनीं व दोन व्हाइसरॉयांनीं सुद्धां आश्चर्य व निषेधप्रदर्शक उद्गार काढले आहेत

अशा प्रकारें हिंदुस्थानच्या कारभारांत अदाधुंदी व अन्याय झालेला आहे. या अन्यायाकडे नजर देण्याविषयीं मी आपणां सर्वांस विनंति करतों विशेषतः कॉन्झरवेटिव पक्षाला माझी विनंति आहे कीं, बादशहांनीं व मुत्सद्दयांनीं आम्हांस वेळोवेळीं जीं अभिवचनें व आश्वासनें दिलीं आहेत त्यांना खोटेपणा आणूं नका. सध्यांचे सेक्रेटरी ग्लॅडस्टनसाहेब यांच्यापाशींही माझें हेंच मागणें आहे. कांहींही करा पण हिंदुस्थानचें जीवनरक्त शोषलें जात आहे तें बंद करा.

मी अशी सूचना पुढें मांडतों कीं, " हिंदुस्थानांतील सर्व स्थिति समजून घेऊन

हिंदुस्थानचा राज्यकारभार सुधारण्यासाठीं काय योजना करावी याचा ताबडतोब विचार करण्यासाठीं एक कमिटी नेमावी" हें मागण्यांत आम्ही तुमच्याजवळून एखादें दान मागत आहों असें मुळींच नव्हे. केवळ न्यायाच्या तत्त्वावर आम्ही ही मागणी करतों अशी कमिटी नेमल्यास हिंदुस्थानांतील सरकारी अधिकाऱ्यांच्या कारभाराच्या चांगुलपणासंबंधीं शंका प्रदर्शित केल्यासारखें होईल, असा कदाचित् कोणी आक्षेप काढतील. त्यांस माझें असें उत्तर आहे कीं, अशी कमिटी पूर्वी नेमल्याचें उदाहरण आहे. हिंदुस्थानचा कारभार जेव्हां कंपनीकडे होता तेव्हां दर वीस वर्षांनीं अशा प्रकारची कमिटी नेमली जात असे. १८५३ सालीं हिंदुस्थानच्या कारभारासंबंधीं जी चौकशी करण्यात आली तिच्यानंतर आतांपर्यंत त्या कारभाराकडे कोणीं लक्ष दिलेलें नाहीं चाळीस वर्षें अदाधुंदींत गेलीं आहेत कमिटी नेमण्याची वेळ आता खास आली आहे म्हणून माझी अशी विनंति आहे कीं, माझ्या सूचनेला आपण सर्वांनीं अनुमोदन द्यावें"

दादाभाईचें हें भाषण इतकें परिणामकारक झालें कीं, त्यांची सूचना पार्लमेंटमध्यें पास झाली, व त्याच्या सूचनेप्रमाणें एक रॉयल कमिशनची नेमणूकही झाली दादाभाईंचें दुसरें भाषण सन १८९५ सालीं फेब्रुवारीच्या १२ व्या तारखेस भरलेल्या पार्लमेंटच्या बैठकींत झालें. त्या प्रसंगीं राणीस अर्पण करण्यासाठीं तयार केलेल्या मानपत्रात खालील मजकूर घालण्याविषयीं दादाभाईंनीं उपसूचना आणली. तो मजकूर असा—( पृष्ठें १५० ते १६४, नटेसन २री आवृत्ति )

**पार्लमेंटमधील दुसरें भाषण**

" हिंदुस्थानांतील इंग्रजी अंमलापासून इंग्लंडास जो कांहीं सांपत्तिक व राजनीतिविषयक फायदा होतो त्या मानानें हिंदुस्थानांतील इंग्रज अधिकाऱ्यांच्या खर्चाचा आणि हिंदुस्थानच्या सरहद्दीबाहेर होणाऱ्या सर्व युद्धविषयक उलाढालींच्या खर्चाचा योग्य भाग ब्रिटिश खजिन्यानें सोसावा" या प्रसंगीं भाषण करतांना दादाभाई म्हणाले, " केवळ वादविवादाकरितां असें गृहीत धरून चालूं कीं, हिंदुस्थानांतील ब्रिटिश अमलापासून इंग्रजांचा व आमचा नफा सारखाच आहे. ( वास्तविक पाहतां आमचा फायदा अगदीं कमी आहे.) तरीसुद्धां माझें असें म्हणणें आहे कीं, या फायद्यासाठीं लागणाऱ्या पैशांपैकीं निम्मे पैसे इंग्रजांनीं आपल्या खिशांतून दिले पाहिजेत. सन१८९३च्या मे महिन्यांत लॉर्ड रॉबर्टसाहेबांनीं

असें बोलून दाखविलें आहे कीं, इंग्लंड व हिंदुस्थान यांचे हितसंबंध ज्या अर्थी अगदीं एकजीव झाले आहेत, त्या अर्थी खर्चाचा वांटा दोघांनींही सारखाच उचलावा हेंच अगदीं न्याय्य व सरळ आहे. हिंदुस्थानांतील सिव्हिल सर्व्हिस अत्यंत महत्त्वाची आहे असें लॉर्ड किंबर्लेसारख्या लोकांना वाटतें. परंतु हिंदी लोकांच्या समाधानवृत्तीखेरीज दुसऱ्या कशावरही या राज्याची सुरक्षितता अवलंबून नाहीं, हें न समजणें आत्मघातकीपणाचेंच म्हटलें पाहिजे. युरोपिअन अधिकाऱ्यांच्या पगाराच्या पायीं होणारा सर्व खर्च ब्रिटिश तिजोरीनें सोसावा असें मीं म्हटलें तरीसुद्धां त्यांत कांहीं वावगें होणार नाहीं. परतु तें सोडून आम्ही सध्या इतकेंच मागतों कीं, त्या खर्चाचा काहीं अंश तरी इंग्रज लोकांनीं आपल्या अंगावर घ्यावा हिंदुस्थानाच्या आसपास असणाऱ्या थोड्याशा जहाजांखेरीज इतर आरमाराच्या खर्चाचा भाग इंग्लंडनें हिंदुस्थानापाशीं काय म्हणून मागावा? त्या आरमारांत एकाही हिंदी माणसाला जागा नाहीं. त्या आरमाराची कीर्ति व प्राप्ति सर्वस्वीं इंग्लंडची आणि खर्चाचा प्रश्न आला कीं, मग मात्र हिंदुस्थान भागीदार, असें काय म्हणून असावें? असल्या अन्यायाच्या कारभारामुळेंच हिंदुस्थान दरिद्री होऊन बसलें आहे. बरें, या दारिद्र्यांत इंग्लंडचा फायदा आहे असेंही नाहीं उलट हिंदुस्थानची जर भरभराट झाली तर त्यातच इंग्लंडचें खरें कल्याण आहे. आज इंग्लंडच्या मालाला पुरेशा बाजारपेठा मिळत नाहींत अशी ओरड ऐकूं येते परतु हिंदुस्थानास सधन करा, म्हणजे तीस कोटी सुधारलेल्या व संपन्न लोकाचें गिऱ्हाईक तुम्हांला आयतें मिळेल, व इंग्लंडच्या व्यापाऱ्यांना पेठांची वाण बिलकुल भासणार नाहीं. येवढेंच काय, पण हिंदुस्थानचा कारभार न्यायानें चालवून हिंदी लोकांना जर संतोषांत ठेवलेंत तर एक नव्हे छप्पन रशियांना सेंट पीटर्सबर्गपर्यंत लोळवीत हटविण्याची इंग्लडमध्यें ताकद येईल हें लक्षांत ठेवा."

सन १८९५ सालीं फेब्रुवारीच्या २१ तारखेस जी पार्लमेंटची बैठक झाली तीमध्यें बाहेरून हिंदुस्थानांत येणाऱ्या सर्व प्रकारच्या कापडावर जकात बसविण्याविषयींच्या सूचनेवर वादविवाद चालला होता. ही सूचना पास झाल्यावर विलायतच्या व्यापाऱ्यांचें नुकसान होणार होतें. तेव्हां ही सूचना नापास करावी, किंवा निदान तिचा निकाल लांबणीवर ढकलावा असा लबाडीचा डाव खेळण्याच्या हेतूनें सर हेनरी जेम्स या कॉन्सरव्हेटिव्ह सभासदानें 'पार्लमेंटची बैठक तूर्त तहकूब व्हावी'

अशी सूचना पुढें आणली. या सूचनेवर खडाजंगी वाद झाला व शेवटीं ती नामंजूर झाली. या प्रसंगीं दादाभाईचें भाषण फार आवेशाचें झालें. ते म्हणाले, (पृष्ठें १६५ते१६७, नटेसन २ री आवृत्ति) "हिंदुस्थानासाठीं इग्लंड एक पै तरी खर्च करतें काय? हिंदुस्थानातील लोकांच्या संतोषावर इंग्रजी राज्याची सुरक्षितता सर्वस्वीं अवलंबून आहे. तुम्ही इंग्रजांनीं हें पक्कें लक्षांत ठेवावें कीं, तुम्ही कितीही थोर व पराक्रमी असलांत तरी आम्हांस तुम्ही एकाद्या सावत्र आईप्रमाणेंच आहात सख्ख्या आईनें कसेंही वागविलें तरी त्यात मुलाला कांहीं वाटत नाहीं. परतु सावत्र आईपासून ततोतत न्यायाची वर्तणूक तोलून घेतल्याखेरीज मुलगा कधींही राहणार नाहीं. सन १८५७ साल विसरूं नका. स्वदेशहितासाठीं चळवळ करणारे निःस्वार्थी पुढारी हिंदुस्थानात आहेत हें विसरूं नका. लेंकेशायरचे व्यापारी आपला स्वार्थ साधावयास सर्वदाच टपले आहेत. ज्यामध्यें हिंदुस्थानचें भयंकर नुकसान आहे अशा गोष्टीसुद्धां लँकेशायरच्या गिरणीवाल्यांनीं आजपर्यंत अनेक वेळां सरकारास करावयास लाविल्या आहेत. त्यातलाच आजचा प्रसंग आहे. परतु या लॅंकेशायरवाल्यांच्या बुजगावणीला पार्लमेंटमधील मुत्सद्दयानीं भिण्याचें मुळींच कारण नाहीं अशा भिण्यानें हिंदुस्थानालाच नव्हे तर ईग्लंडलासुद्धां पुढें मागें धोका पोंचेल. म्हणून युनिअनिस्ट सभासदांना व होमरूलवाल्यांना माझें असें कळकळीचें सांगणें आहे कीं, या तहकुबीच्या सूचनेविरुद्ध तुम्ही आपलें मत द्या, नाहीं तर हिंदुस्थानांतील इंग्रजी सत्तेचा कपाळमोक्ष तुम्ही आपल्या हातांनीं करावयास सुरुवात केल्यासारखें होईल. ही तहकुबीची सूचना मंजूर झाल्याची तार आज हिंदुस्थानांत गेली तर सर्व हिंदी लोक एकदम हवालदील होऊन ब्रिटिश सरकारच्या न्यायप्रियतेवरचा त्यांचा विश्वास अजीबात उडून जाईल. काय परिणाम होतील तें सांगवत नाहीं, पण ते अनिष्ट होतील तें येवढें खास. म्हणून म्हणतों कीं, ही तहकुबीची सूचना मंजूर होतां कामा नये."

**पार्लमेंटांतील तिसरें भाषण**

याच सुमारास रशिया हिंदुस्थानावर स्वारी करणार अशी बातमी सगळीकडे पसरली व जो तो त्याविषयीं बोलूं लागला. रशियानें खरोखरच स्वारी केली तर काय उपाय करावा, याविषयीं इंग्रजी वर्तमानपत्रांत मोठी चर्चा सुरू झाली. तें पाहून 'इंडिया' पत्राच्या सप्टेंबरच्या एका अंकात 'रशियाच्या स्वारीचें भय' या

मथ"याखालीं दादाभाईंनीं आपले विचार प्रगट केले त्या लेखाचा सारांश असा ( पृष्ठ ६५८ ते ६६४, नटेसन २ री आवृत्ति )—

" रशियनस्वारीच्या प्रश्नाचा विचार करताना सर्वांच्या हातून एक मोठी चूक होत आहे ती ही कीं, ब्रिटिश हिंदुस्थानांतील व हिंदी संस्थानांतील जनतेची वृत्ति कशी आहे या अत्यंत महत्त्वाच्या बाबीकडे त्यांचें लक्ष

**हिंदुस्थानावर परचक्र आलें तर!**

जावें तसें जात नाहीं हिंदी प्रजा जर सतुष्ट असेल तर प्रश्नच नाहीं—मग हिंदुस्थानातील इग्रजी राज्याला प्रत्यक्ष काळाची ही भीति नाहीं परतु ती जनता जर असतुष्ट असेल तर रशियन स्वारीचा विचार करतांना त्यांच्या असमाधानाकडे दुर्लक्ष करणें मूर्खपणाचें आहे हिंदुस्थानात असतोषाचे निखारे धुमसत आहेत असें जर रशियन लोकास कळलें तर त्या निखाऱ्यावर वारा घालून आग कशी भडकवावी हें काहीं त्याना कोणी शिकवायला नको आयर्लंडमध्यें ब्रिटिश सरकारनें असल्याच राजनीतीचा अवलंब केला होता हिंदी लोक असतुष्ट असले तर रशिया स्वारी करणार यात तिळमात्र संशय नाहीं—त्याचा जय होणें न होणें गोष्ट निराळी

" गेल्या शतकात ज्या युरोपिअन किंवा अँग्लो-इडियन मुत्सद्द्यांनीं हिंदुस्थान-चा राज्यकारभार हाकला त्याचें असें मत आहे कीं, ब्रिटिश राज्यपद्धति अत्यत सदोष व भयप्रद असून तिचे काय काय दुष्ट परिणाम होतील याची कल्पना करवत नाहीं ज्या राज्यपद्धतीमुळें अफूच्या व्यापाराला ऊत येतो, देशांतील हजारों स्त्री-पुरुषाच्या शरिरांत व्यसनाचें विष ओतलें जातें, मिठाच्या व्यापारा वर अजस्र कराचा बोजा पडतो, जमीनमहसुलाची वसुली दंडुकेशाहीनें केली जाते, कोट्यवधी लोक दारिद्र्यांत होरपळतात, व लाखों जीवांचा दुष्काळांत नाश होतो ती राज्यपद्धति अमानुष म्हटली पाहिजे असें या मुत्सद्द्यांचें स्पष्ट मत आहे

" मग अशा राज्यपद्धतीमुळें जनतेमध्यें असंतोष पसरला तर त्यांत नवल कसचें ? मी तर म्हणतों कीं, आमच्या सस्थानिकांनीं इंग्रज सरकाराविरुद्ध समशेर उपसली तर त्याचासुद्धां दोष या राज्यपद्धतीच्याच माथीं आहे.

" इंग्रज लोकांनीं या सर्व गोष्टींचा नीट विचार केला पाहिजे. हली.ची जुलमी, सर्वभक्षी व असंतोषोत्पादक राज्यपद्धति आहे तशीच चालू राहिली तर रशिया स्वारी केल्यावांचून राहणार नाहीं. उलट, इंग्रजांनीं हिंदी प्रजेंत संतोष उत्पन्न

केला तर एक सोडून छप्पन रशियांच्या स्वाऱ्या हिंदी वीराच्या निधड्या छाती-पुढें आपोआप परत फिरतील."

ज्या रॉयल कमिशनची मागणी १८८५ च्या पहिल्या काँग्रेसमध्यें करण्यांत आली व ज्याविषयींचा ठराव १८९४ च्या ऑगस्ट महिन्यात दादाभाईंनीं पार्लमेंटात आणला तें कमिशन १८९५ मध्यें बसलें दादाभाई या कमिशनचे एक सभासद होते रॉयल कमिशनमध्यें बसलेले पहिले हिंदी गृहस्थ दादाभाईच हा सन्मान त्यास मिळाल्याबद्दल त्यांच्या सर्व देशबांधवांस फार आनंद झाला परंतु या सन्मानाच्या फुकट्या आनंदांत गर्क होऊन दादाभाई मोहून गेले नाहींत कमिशनपुढें त्यांची जी साक्ष झाली ती अत्यत स्पष्ट व निर्भीड होती त्या साक्षीचा सारांश येणेंप्रमाणे.—( Appendix A, नटेसन २ री आवृत्ति )

**रायल कमिशन**

" सन १८३८च्या पार्लमेंटच्या ठरावातील व सन १८५८च्या राणी-सरकारच्या जाहीरनाम्यातील समतेचें तत्त्व न पाळल्यामुळें हिंदुस्थान दरिद्री व दीन झालेला आहे त्यास उपाय हाच कीं, परकी नोकर कमी करावे किंवा त्याचा खर्च विलायत सरकारनें सोसावा. मुळींच परकी अधिकारी नको असें नाहीं, केवळ हिंदुस्थानचा मनुष्य म्हणून कोणच्याही दर्जाला नालायकी आहे ती काढून टाका हिंदुस्थानांतील गोरे अधिकारी व गोरें सैन्य कमी झाल्यास बेबंद-शाही माजेल हें म्हणणें चुकीचें आहे, तसें असेल तर इंग्रजांच्या राज्याचा कांहींच उपयोग झाला नाहीं असें होईल"

कमिशनपुढें नुसती साक्ष देऊन दादाभाई स्वस्थ बसले नाहींत कमिशनच्या रिपोर्टांत हिंदुस्थानास हितकारक अशा कांहींतरी सूचना व्हाव्या म्हणून त्यांनीं फार प्रयत्न केला कमिशनचे अध्यक्ष वेल्बीसाहेब यांना आपल्या मतांची सत्यता पटविण्यासाठीं त्यांनीं पांचसहा लेख ( Memoranda ) त्यांजकडे पाठविले १८९५ पासून १८९७ पर्यंत तीन वर्षें हे लेख लिहिण्याचें व पाठ-विण्याचें काम दादाभाई करीत होते. त्यात राज्यपद्धतींतील दोषांचें आविष्करण करून कोणत्या सुधारणा अगदीं अवश्य आहेत हें त्यांनीं स्पष्टपणें दाखविलें

प्रकरण सातवें

# स्वराज्यमंत्रोच्चार–शेवटचीं वर्षें

वेल्बीसाहेबास Memoranda पाठविण्याचें काम चालू असता दादाभाईच्या मनास अत्यंत खेददायक अशी एक गोष्ट घडून आली. सन १८९३ सालीं समकालीन I C S ची परीक्षा घेण्याबद्दलचा ठराव पास झाला, हें पूर्वी सांगितलेंच आहे. वास्तविक पाहता हा ठराव पास झाल्यानंतर तो अमलांत आणावा कीं नाहीं हा प्रश्नच उरला नव्हता. फक्त त्याची अमलबजावणी कोणत्या रीतीनें करावी, त्या रीतीसंबंधीं हिंदुस्थानसरकारचें मत घेणें रास्त होतें. परंतु त्या वेळचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड किंबर्ली यांनीं काय केलें? हिंदुस्थानसरकार या ठरावाविरुद्ध आहे हें माहीत असूनही, आणि या ठरावाच्या अमलबजावणीस कोणत्याही तऱ्हेचा अडथळा न करण्याचें खाजगी वचन दादाभाईस दिलें असूनही

**भरंवशाच्या म्हशीला टोणगा झाला**

त्यांनीं या ठरावाचें कोंकरूं हिंदुस्थानसरकाररूपी लांडग्यापुढें सोडलें. अर्थात्, आपली सर्व शक्ति एकवटून हिंदुस्थानसरकारनें या ठरावास विरोध केला, आणि या विरोधाची सबब पुढें करून या ठरावाची अमलबजावणी सोडून देण्याचें ब्रिटिश सरकारनें ठरविलें.

हा प्रकार पाहून दादाभाईस जितका विस्मय वाटला तितकाच संतापही आला. प्रत्यक्ष पार्लमेंटचे ठराव पायाखालीं तुडविण्याची शक्ति हिंदुस्थानच्या अधिकाऱ्यांत असावी याचें त्यांना अत्यंत आश्चर्य वाटलें. ही राज्यपद्धति आहे तरी कोणत्या मुलुखाची! ही धडधडीत सुलतानी चालते तरी कशी? अशा दडपशाहीविरुद्ध कायदेशीर चळवळ करून काय उपयोग? असे अनेक प्रश्न त्यांच्या मनांत उभे राहिले, आणि आज चाळीस वर्षें आपण केलेल्या कामाची शेवटीं अशीच निष्फलता होणार कीं काय अशा निराशामय शंकेनें त्यांचें अंतःकरण उद्विग्न होऊन गेलें. हीच उद्विग्नता सारखी वाढत जाऊन सन १९०६ सालीं दादाभाईनीं स्वराज्याच्या मागणीचा स्पष्ट उच्चार केला असेल असें वाटतें. कारण, या निराशेच्या भरांत त्यांनीं वेल्बीसाहेबास जीं एक दोन पत्रें लिहिलीं त्यांमध्यें स्वराज्याच्या मागणीची पुसट पुसट रूपरेखा आहे असें सूक्ष्मपणें पाहणाराला

सहज दिसून येईल या पत्रांत ( पृष्ठें ३६० ते ४००, नटेसन २ री आवृत्ति ) ते लिहितातः—

" हिंदुस्थानच्या कारभाराबाबत जो पैसा खर्च होतो त्या पैशाच्या संख्येला महत्त्व नसून आमची मुख्य तक्रार अशी आहे कीं, त्या पैशाचा अपव्यय होत आहे एकदोन खात्यांतील खर्च थोडासा कमी करावयाचा येवढेंच या कमिशनचें काम नाहीं, तर आमच्या नैतिक, सांपत्तिक, शारीरिक शक्तींचें शोषण करणारी ही अन्यायी राज्यपद्धति नष्ट झाली पाहिजे हिंदुस्थानांतील लोकांत असंतोष पसरलेला आहे त्याचीं कारणें मुख्यतः हीं आहेत—[१] ज्यांत हिंदी लोकांचें बिलकुल ऐकलें जात नाहीं अशी इंग्रजांच्या दानतीला न शोभणारी बादशाही राज्यपद्धति, [२] हिंदी लोकांच्या संपत्तीचें शोषण व त्यामुळें देशास प्राप्त झालेलें भयंकर दारिद्र्य, आणि [३] पार्लमेंटच्या व राणीच्या अभिवचनाची हिंदुस्थानांतील अधिकाऱ्याकडून झालेली निंद्य अवहेलना या सर्व गोष्टी दूर झाल्याखेरीज राज्य सुधारणार नाहीं साम्राज्याचे तुम्ही भागीदार आहां असें नुसतें म्हणून काय उपयोग ? कांहीं **खरी भागीदारी** आम्हास द्याल तेव्हां खरें "

सन १८९८ सालीं India Currency Committeeच्या कामाला सुरुवात झाली हिंदुस्थानांतील टांकसाळी सन १८९३ सालीं बंद केल्या होत्या, त्या पुन्हा सुरू कराव्या किंवा नाहीं, व हिंदुस्थानांत सोन्याचें नाणें चालू करावें कीं नाहीं हें दोन प्रश्न या कमिटीकडे मुख्यतः होते सर वुइल्यम वेडरबर्न यास दादाभाईच्या हिंदुस्थानविषयक पूर्ण ज्ञानाबद्दल खात्री असल्यामुळें त्यांनीं त्यांस लिहिलें कीं, अशी अशी कमिटी बसलेली आहे व या बाबतींत तुम्हीं कांहीं लेखी माहिती पाठविलीत तर कमिटीकडून तिचा योग्य विचार होईल वेडरबर्न यांचें पत्र मिळाल्याबरोबर दादाभाईंनीं आपलें मत लिहून काढून त्यांजकडे धाडलें तें असेंः—( Appendix B., नटेसन २री आवृत्ति ) " सन १८९३ सालीं टांकसाळी बंद करण्यांत सरकारनें फार मोठी चूक केलेली आहे. त्या वेळीं ट्रेझरीवरील अधिकाऱ्यांनीं व सन १८९३च्या कमेटीनें सरकारच्या योजनेविरुद्ध आपला अभिप्राय स्पष्टपणें कळविला होता. हिंदुस्थानांतील अधिकाऱ्याच्या बेसुमार हटवादीपणाचेंच मुळीं तें उदाहरण होतें आतां तरी सन १९१३ची चूक दुरुस्त होऊं द्या. टांकसाळी सुरू झाल्या म्हणजे सध्यां द्रव्याची जी कुचंबणा झाली आहे ती नाहींशी होईल, व्यापाराची विस्कळित स्थिति सुधारेल, आणि हलीं जे

अवास्तव कर ठेवावे लागले आहेत ते बंद करतां येतील. सोन्याचें नाणें सुरू करण्याची कल्पना प्रस्तुत स्थितींत अगदीं त्याज्य आहे. असल्या नाण्याचा फायदा येवढाच कीं, हिंदुस्थानात व्यापार करणाऱ्या परकी लोकांची गैरसोय दूर होईल पण सोन्याच्या नाण्याचे दुष्परिणाम मात्र फार आहेत शिवाय टांकसाळी सुरू केल्यानें किंवा सोन्याच्या नाण्याची योजना सोडून दिल्यानें हिंदुस्थानची स्थिति मोठीशी सुधारेल असें कोणींही समजूं नये ती स्थिति सुधारण्याचा खरा मार्ग एकच आहे व तो हा कीं, परकी अधिकारी दूर करून हिंदुस्थानची सत्ता हिंदी लोकाच्या हातीं दिली पाहिजे."

सन १८९६ व १८९७ सालीं हिंदुस्थानात भयंकर दुष्काळ पडला सन १८७६ च्या दुष्काळानतर लगेच वीस वर्षांनीं हा दुष्काळ पडलेला पाहून हिंदी लोकास फारच काळजी वाटू लागली या दुष्काळाच्या हृदयस्पर्शी बातम्या इग्लडांतही गेल्या, व या सकटाची चौकशी करण्याकरिता एक कमिशन नेमा, असें काहीं लोक म्हणूं लागले परंतु

**पुन्हा दुष्काळ**

दादाभाईंची पक्की खातरी होती कीं, असल्या कामिशनाची काडीइतकीसुद्धा उपयुक्तता नाहीं दुष्काळाचें खरें कारण अन्यायी व बेजबाबदार राज्यपद्धति होय. हें इग्लंडमधील लोकाना नीट माहीत नव्हतें, म्हणून ते कमिशन नेमण्याचा उपाय सुचवीत होते तेंव्हा ठिकठिकाणीं व्याख्यानें देऊन हिंदुस्थानातील दुष्काळाचा उद्भव पाऊसपाण्याच्या टचाईपासून होत नसून "शक्य तितकें हिंदुस्थानाला पिळून काढावयाचें" अशा प्रवृत्तीनें चालविलेल्या राज्यकारभारापासून कसा होतो हें इग्रज जनसमूहास समजावून देण्याचा दादाभाईंनीं उपक्रम चालविला. दादाभाई इग्रज लोकास या विषयाविषयीं काय सागत असत याची कल्पना येण्यासाठीं त्याच्या एकदोन व्याख्यानाचा थोडक्यात साराश देणें बरें.

तारीख ९ जुलै सन १९०० या दिवशीं युनायटेड मेथॉडिस्ट फ्री चर्चमध्यें दुष्काळफंडाच्या मदतीकरिता दादाभाईंचें व्याख्यान झालें. त्या वेळीं ते म्हणाले, (पृष्ठें २१९ तें २२५, नटेसन २री आवृत्ति) "हिंदुस्थानातील दुष्काळाचें कारण जलवृष्टीचा अभाव आहे असें तुम्हास वाटत असल्यास तुमची कल्पना चुकीची आहे. दुष्काळाची खरी मीमांसा अशी आहे कीं, तुम्ही आमच्याकडून दरवर्षीं १० कोटी पौंड वसूल घेतां आणि त्यांतील एक पैसा देखील आमच्यासाठीं खर्चिला न जातां ते दीडशें कोट रुपये इंग्लडांत येऊन पडतात. आज-

पर्यंत अनेक लढाया लढून तुम्हीं हिंदुस्थानच्या राज्याची उभारणी केलीत व त्यासाठीं क्रोडो रुपये खर्च झाले, परतु तुम्हीं इग्रजांनीं पदरची एक पै तरी या कामासाठीं खर्च केली आहे काय ? लढायासाठीं आमचा पैसा घ्यावयाचा, आमच्यापासून वाटेल तितका वसूल उकळावयाचा, मुलकी व लष्करी अधिकारा च्या जागीं इग्रज लोक नेमून त्याचीं पोटें आमच्या पैशावर चालवावयाचीं असें आमच्या सपत्तीचें शोषण तुम्हीं सारखें चालविलें आहे अशी राज्यपद्धति दुसऱ्या कोणत्याही देशात नाहीं व असती तर त्या देशाचें केव्हाच वाटोळें झालें असतें हिंदुस्थान म्हणूनच अजून टिकला आहे हिंदी लोक म्हणूनच अजून राजनिष्ठ राहिले आहेत, पण ही राजनिष्ठा कधींच भंग पावणार नाहीं असे समजूं नका लवकर जागृत होऊन राज्यपद्धति सुधारलीत तर हे दुष्काळ नाहींसे होतील एवढेंच नव्हे तर हिंदुस्थानाशीं तुमचा सध्या जो व्यापार आहे तो कितीतरी पटींनीं वाढून तुमचा आर्थिक फायदा होईल "

" दुष्काळाचें कारण व निवारण " या विषयावर Croydon येथील Free Churchमध्यें दिलेल्या एका व्याख्यानांत दादाभाई म्हणाले, ( पृष्ठें २३४ ते २४७ नटेसन २री आवृत्ति ) " आज तीन कोट हिंदी लोक दुष्काळात मेले, ही गोष्ट तुम्हांला भयकर वाटत नाहीं काय ? हा दुष्काळाचा प्रश्न हिंदुस्थानाइतकाच इग्लंडच्याही जिव्हाळ्याचा आहे कारण, हिंदुस्थानची भरभराट जोंपर्यंत आहे तोंपर्यंत इग्लंडमध्यें सौख्य नांदेल, आणि हिंदुस्थानची दुर्दशा झाली कीं, इग्लंडचें मरण तावडतोब ओढवेल ! लॉर्ड कर्झन यांचें देखील असेंच मत आहे महमद गझनीनें अठरा वेळच्या लुटींत मिळून नेली नसेल इतकी सपत्ति तुम्ही दरवर्षी हिंदुस्थानांतून नेता आणि ही सांपत्तिक जखम सारखी वाढतच जात आहे मग दुष्काळ पडतील नाहीं तर काय होईल ? बरें, दुष्काळ पडल्यावर तरी तुम्ही आपल्या स्वार्थाची भर करण्यास कमी करतां का? तेंही नाहीं मागच्या दुष्काळांत एकीकडे लोक अन्नावांचून तडफडून मरत होते, आणि दुसरीकडे युरोपिअन अधिकाऱ्यांच्या पगारांची व पेन्शनांची पुरती भरती करण्यासाठीं रयतेकडून पैसा पिळून घेतला जात होता एखाद्या वर्षी फार मोठा दुष्काळ पडला म्हणजे तुमचें लक्ष हिंदुस्थानाकडे जातें. परंतु वास्तविक पहातां दुष्काळ म्हणजे हिंदुस्थानचें कायमचें दुखणें झालेलें आहे या दुखण्याचें खरें कारण हिंदुस्थानातील ॲंग्लो-इंडियन अधिकाऱ्यांनीं चालविलेलें

अन्यायी राज्य हें असलें राज्य सुधारल्याखेरीज हिंदुस्थानांतील दुष्काळ थांबणार नाहींत"

सन १९०० सालानंतर दादाभाईंच्या चळवळीवर हळुहळू खिन्नता, निराशा व त्रागा यांची छाया पडूं लागली त्यांची खात्री होत चालली कीं, हिंदुस्थानविषयक प्रश्नाच्या बाबतींत इंग्रज अधिकाऱ्यांच्या गाठी घेण्यांत, त्यांच्याशीं वादविवाद करण्यांत किंवा पत्रव्यवहार चालू ठेवण्यात कांहीं अर्थ नाहीं हिंदुस्थानची विपन्न स्थिति या अधिकाऱ्यास माहीत नसते असें नाहीं, किंवा ती स्थिति सुधारण्याचे उपाय त्यांस सुचत नाहींत किंवा करता येण्यासारखे नसतात असेंही नाहीं त्यास सर्वकांहीं समजत असतें परतु अंगीं न्यायीपणा

**निराशेची वाढ** बाणून हिंदी लोकापासून आयत्या मिळणाऱ्या उबेल्याला थोडासा देखील चट्टा लागू देण्याइतके औदार्य त्याजमध्ये नसल्यामुळें अज्ञानाचें वेड ते पांघरीत असतात निजलेल्याला जागें करता येतें, पण जागत्या माणसाला जागें करीत बसण्यात काय फायदा आहे, असें दादाभाईंस वाटूं लागलें शिवाय, इंग्रज जनता अधिक न्यायी आहे, परतु सामान्य इंग्रज लोकास हिंदुस्थानातील अव्यवस्था कळत नसल्या-मुळें हिंदुस्थानविषयक प्रश्नाची चर्चा पार्लमेंटमध्यें होत नाहीं हिंदुस्थानासंबधीं प्रश्नाची चर्चा पार्लमेंटमध्यें होत नाहीं, हिंदुस्थानासबंधीं खरी माहिती सांगून जर कोणी इंग्रज जनतेच्या मनातील न्यायप्रियता जागृत केली तर त्या जनतेंत हिंदुस्थानाविषयीं कळकळ उत्पन्न होईल, आणि नतर या जनतेनें निवडून दिलेल्या पार्लमेंट सभासदांस हिंदुस्थानची दाद लावणे भाग पडेल, असें दादाभाईं-च्या मनांत फार येऊं लागलें म्हणून अधिकाऱ्यांच्या डोक्याशीं उरस्फोड करण्यापेक्षा सामान्य जनतेला हिंदुस्थानची दुःस्थिति समजावून सांगितलेली अधिक बरी, कारण असे केल्याने त्या जनतेच्या सामर्थ्याचा हिंदुस्थानला फार उपयोग होईल, अशा विचारानें सामान्य इंग्रज लोकापुढे व्याख्यानें देण्याचा उपक्रम दादाभाईंनी सुरू केला. या धोरणानें सन १९०१ ते १९०६ त्यांनीं अगणित व्याख्यानें दिलीं या व्याख्यानात ते काय सागत असत याची कल्पना येण्या-साठीं एका व्याख्यानाचा सारांश खालीं दिला आहे

जुलै ता.४ सन १९०१ रोजीं North Lambeth Liberal club मध्यें Colonel Ford यांच्या अध्यक्षतेखालीं 'इंग्रज जनता व हिंदुस्थान'

या विषयावर बोलतांना दादाभाई म्हणाले—( पृष्ठें २४८ ते २५२, नटेसन २ री आवृत्ति ) " हिंदी लोकांस वेळोवेळीं दिलेल्या अभिवचनांची पूर्तता करण्यांत येत नाहीं, हिंदी लोकांचा पैसा सारखा इंग्लंडांत ओढला जात आहे, हिंदुस्थानांत करांची वाढ अमर्यादपणें होत आहे, हिंदुस्थानांत सारखा दुष्काळ असतो–या सर्व अव्यवस्थेची जबाबदारी कोणावर आहे असें तुम्ही समजतां ! ती तुम्हां इंग्रज लोकांवर आहे राज्यकारभाराच्या बाबतींत इग्लंडांतील एका मतदाराला जितका हक्क आहे तितका सगळ्या तीस कोटी हिंदी लोकांना मिळून देखील नाहीं आमच्या देशांतील कायदे कौन्सिलें म्हणजे निव्वळ सोंगें आहेत अमलबजावणीचा अधिकार असावयाचा इंग्रज सभासदाच्या हातीं आणि हिंदी कौन्सिलरांनीं नुसतें चित्रासारखें बसावयाचें– असलीं हीं कौन्सिलें असण्यापेक्षा नसलेलीं बरीं ! तुम्हां इंग्रज लोकांच्या हातीं आज बरीच सत्ता आहे खरें म्हटलें तर आमच्या दुःखाच्या वेदना तुम्हास कळल्या पाहिजेत, कारण, असलीं दुःखें तुम्हीं पूर्वी सोसलीं आहेत म्हणून आम्ही तुमची मदत मागतों. या वेळीं तुम्हीं आम्हास मदत केली पाहिजे तुमच्या सामर्थ्याच्या जोरावर पार्लमेंटच्या सभासदांना तुम्ही बजावून सांगा कीं, हिंदी लोकास आजपर्यंत दिलेलीं सर्व वचनें पूर्ण झाली पाहिजेत तुम्हीं असें केलेंत कीं आम्हांस न्याय मिळेल "

नवव्या राष्ट्रीय सभेचे अध्यक्ष या नात्यानें दादाभाईनीं जें भाषण केलें त्यांत त्यांनीं ध्वनित केलें होतें कीं, कॉंग्रेस व इंग्रज जनता यांचा जितका निकट संबंध येईल तितका पाहिजे आहे त्यानंतर दहा अकरा वर्षांत अशा कांहीं गोष्टी घडून आल्या कीं, राजकीय चळवळ करून अधिकाऱ्यांना जागृत करण्याच्या दादा भाईंच्या उमेदीवर एकामागून एक आघातच होत गेले. इंग्रजी न्यायप्रियतेवरचा त्यांचा स्वतःचा विश्वास पुसट होऊं लागला, आणि स्वतःच्या मनाची ही वृत्ति पाहून, कदाचित् सबंध हिंदी जनतेंतही इंग्रजांविषयींचा अविश्वास वाढत आहे कीं काय, अशी त्यांस शंका येऊं लागली हिंदी लोक फार असंतुष्ट झाल्यास त्यांच्या हातून कांहींतरी अविचार होऊन साम्राज्यास व हिंदुस्थानास अनिष्ट अशा कांहीं गोष्टी घडून येण्याचा संभव आहे असें त्यास वाटू लागलें, आणि स्वतःच्या मनाची स्थिति कशीही असली तरी सामान्य हिंदी लोकांचा इंग्रजां वरील विश्वास पूर्वीप्रमाणें कायम राहिला पाहिजे अशा धोरणानें सन १९०४

सालीं दादाभाईनीं एक गोष्ट केली त्या वर्षीच्या राष्ट्रीय सभेचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याविषयीं सर हेनरी कॉटन यांचें मत त्यांनीं वळविलें सर कॉटन यांस अध्यक्ष करण्यांत हिंदी लोकांच्या मनात वाढू पाहणारी इंग्रजाच्या न्यायाविषयीं निराशा दूर करावी हा हेतु दादाभाईच्या मनांत प्रामुख्यानें होता याबद्दल शंका नाहीं हिंदुस्थानास जाण्याकरितां सर हेनरी कॉटन यास निरोप देण्यासाठीं सन १९०४च्या नोव्हेंबरमध्यें वेस्ट मिनिस्टर पॅलेस हॉटेलांत जी सभा भरली होती त्यांत दादाभाईनीं आपला हेतु बोलूनही दाखविला ते म्हणाले, (पृष्ठें २५७ ते २६५, नटेसन २री आवृत्ति) " सन १८५३ सालीं मुबई, मद्रास व कलकत्ता येथें Presidency Associations स्थापन झाल्या तेव्हापासून आमच्या राजकीय चळवळीला प्रारभ झाला हिंदुस्थानच्या राज्यकारभारात सुधारणा घडवून आणणें हें आमचें ध्येय आहे परतु या सुधारणा करून देणें न देणें सर्वस्वीं इंग्रजाच्या हातीं असल्यामुळें आम्हा हिंदी लोकाच्या ओरडण्यापेक्षा सर कॉटन यासारखे इंग्रज गृहस्थ आमच्यात आले तर आमच्या चळवळीला अधिक महत्त्व येईल शिवाय सर कॉटनसारखी मडळी आम्हास मदत करू लागली म्हणजे इग्रजाची सदसद्विवेकबुद्धि अजीबात नष्ट झाली असें जें हिंदी लोकास वाटू लागलें आहे तें बद होईल हिंदी लोकाच्या मनात इग्रजाविषयीं विश्वास राहणें फार अवश्य आहे आणि येवढ्याचसाठीं माझी अशी विनाति आहे कीं, सर कॉटनसारख्या शेंकडों लोकानीं हिंदुस्थानात गेलें पाहिजे, तेथील स्थिति समजावून घेतली पाहिजे, परस्पर विश्वास व आपलेपणा उत्पन्न केला पाहिजे, आणि हिंदी लोकास कोणत्या तरी प्रकारची स्वायत्तता मिळवून दिली पाहिजे"

या व्याख्यानातील 'स्वायत्तता' हा शब्द महत्त्वाचा आहे सन १९०६ सालच्या कॉंग्रेसच्या व्याख्यानात दादाभाईनीं स्वराज्याची जी मागणी केली त्या मागणीचा विचार त्याच्या मनात कसा दृढ होत गेला हें पाहणें मनोरजक आहे सन१८९६ सालच्या सुमारास वेल्बीसाहेबांस लिहिलेल्या एका पत्रातील " आम्हांस (साम्राज्याची) कांहीं खरी भागीदारी द्या " या वाक्यावरून त्या वेळींच स्वराज्याची आवश्यकता दादाभाईच्या मनात येऊं लागली होती असें वाटतें, हें त्या पत्राची हकीकत देतांना सांगितलेंच आहे त्या पत्रांत 'साम्राज्याची भागीदारी' असा अस्पष्ट शब्दप्रयोग दादाभाईनीं वापरला होता. परंतु वरील व्याख्यानांत 'स्वायत्तता' हा अधिक स्पष्ट शब्द आला यावरून

इ० १९०४ सालीं दादाभाईंचें स्वराज्यविषयक विचार अधिक निश्चित झाले असें अनुमान करावयास कांहीं हरकत नाहीं

आश्चर्याची गोष्ट ही कीं, हिंदी लोकांच्या मनांत इंग्रजाविषयीं अविश्वास वाढू नये म्हणून दादाभाई एकीकडे प्रयत्न करीत असतां दुसरीकडे जणुं काय तो अविश्वास जोरानें वाढावा अशा हेतूने लॉर्ड कर्झन यानीं व्हाइसरॉय या नात्यानें हिंदुस्थानांत वाटेल तसें वागण्याचा व बोलण्याचा सपाटा चालविला हिंदी लोकांच्या अंगीं नीति नाहीं, शरीरसामर्थ्य नाहीं, बुद्धि नाहीं, त्यांना गुलामां-प्रमाणेंच वागविलें पाहिजे, अशा प्रकारचे उद्गार लॉर्ड कर्झन यांच्या तोंडून भर सभांतून निघूं लागले ज्या पद्धतीनें आम्हीं हिंदुस्थानात राज्य चालविलें आहे त्यांत काडीइतकी सुधारणा आम्ही करणार नाहीं, अशी त्याच्या जिभेवर अहर्निश नाचणारी दर्पोक्ति, लोक दुष्काळानें मरत असतां त्यानीं भरविलेला दरबार, प्रत्यक्ष राजासही क्षणभर कमी लेखणाऱ्या गर्वाच्या ताठ्यानें ओतप्रोत भरलेलें त्याचें दरबारांतील वर्तन व भाषण त्याची बंगालची फाळणी, या सर्व गोष्टी इतिहास प्रसिद्ध आहेत लॉर्ड कर्झन याच्या या अरेरावीनें सर्व हिंदी लोक चिडून गेले, हजारों ठिकाणीं टोलेजंग सभा भरल्या व चोहोंकडून कर्झन याच्या धोरणाचा निषेध झाला. कर्झनशाही व तिचें फळ पाहून दादाभाईंना एका प्रकारें वाईट वाटलें व एका दृष्टीने आनंद झाला कर्झनसारख्या वरिष्ठ अधिकाऱ्यानें असें अनुदार व गैरशिस्त वर्तन करावें याचा त्यास खेद झाला लिटनशाहीच्या वेळीं जी निराशा त्याच्या मनांत उत्पन्न झाली होती तिचीच आता पुनरावृत्ति झाली असें म्हणण्यास हरकत नाहीं. परतु या प्रसंगीं निराशेबरोबर थोडासा आनदही त्यांस वाटत होता हिंदी लोकांनीं कर्झनशाही शेळ्यामेंढ्यांप्रमाणें निमुटपणें सहन न करता जोरानें उसळून आपणामध्यें कांहीं तरी जोर आहे असें जगाला दाखविलें या गोष्टीनें त्यांचें फार समाधान झालें कर्झनशाहीचा दादाभाईंच्या चित्तवृत्तीवर काय परिणाम झाला हें त्यांच्या इंग्लडमधील एका भाषणावरून स्पष्ट दिसतें कर्झनसाहेबांनीं हिंदी लोकावर जे शिंतोडे उडविले होते व ज्या अनुदार धोरणानें कारभार चालविला होता त्याचा निषेध करण्याकरितां सन १९०९ सालच्या मे महिन्यात इंग्लंडांतील हिंदी रहिवाशांची जंगी सभा वेस्ट मिनिस्टर येथील कॅक्स्टन हॉलमध्यें भरली होती. या सभेंत अध्यक्ष या नात्यानें भाषण करतांना ( पृष्ठें २७४ ते २८३, नटेसन २ री आवृत्ति ) दादाभाई म्हणालेः—

" आज आपण या ठिकाणीं फार महत्त्वाच्या कामाकरितां जमलों आहों हिंदुस्थानांत विलक्षण गोष्टी घडून आल्या आहेत. लोकामध्यें मोठी खळबळ उडून गेली आहे, ठोलेजग सभा ठिकठिकाणीं होत आहेत, आणि सर्वांत उच्च अधिकाराच्या जागीं असलेल्या एका व्यक्तीच्या शब्दांचा व कृतीचा लोक स्पष्टपणें निषेध करीत आहेत. हा प्रकार खरोखरच अद्भुत होय. सबंध हिंदी जनतेनें एकदिलानें आणि जोरानें जाहीर केलें आहे कीं, प्रचलित राज्यपद्धतींत सुधारणा झालीच पाहिजे जनता व अधिकारीवर्ग यांमध्यें आता चागलें युद्ध जुंपलें आहे कलकत्त्याची पहिली निषेधप्रदर्शक सभा ज्या दिवशीं झाली तो दिवस मी अत्यत महत्त्वाचा समजतों, कारण माझ्या मतें हिंदी राष्ट्राच्या स्वातंत्र्याचा त्या दिवशीं जन्म झाला तो दिवस पहावयास मी जगलों हे माझें परम भाग्य होय सरकार व प्रजा यांमधील या युद्धाचा शेवट काय होईल ? या प्रश्नाचें उत्तर " हिंदी लोकांचें कल्याण करण्याच्या कर्तव्याकडे आम्ही दुर्लक्ष करीत आहों खरे-परंतु या पापाचें प्रायश्चित्त आमच्या मुलां-बाळांस भोगावे लागल्याशिवाय राहणार नाहीं" अशा शब्दांत ब्राइट-साहेबानीं पूर्वीच देऊन ठेविलें आहे सर जॉन मालकम व लॉर्ड हार्टिं-गट्न यांचेंही मत असेंच आहे हिंदी लोकाना गुलामाप्रमाणें वागविण्याच्या कर्झनसाहेबांच्या धोरणामुळेंच चिडून जाऊन आजपर्यंतची मुग्ध वृत्ति हिंदी लोकानीं आतां सोडली आहे काहीं झाले तरी आम्ही स्वतःस गुलामाप्रमाणें वागवून घेणार नाहीं असें त्यांनीं सरकारास बजावलें आहे याच जोरानें व धैर्यानें त्यांनीं पुढें चाललें पाहिजे म्हणजे त्यांच्या चळवळीस यश खास येईल तो यशाचा मंगल दिवस पाहावयास मी कदाचित् जिवंत राहणार नाहीं परंतु तो दिवस उगवणार याविषयीं माझा दृढ विश्वास आहे

हिंदी लोकांविषयीं जे प्रलाप कर्झनसाहेबांनीं काढले आहेत त्यांविषयीं मला येवढेंच सांगावयाचें आहे कीं, सन १८८० सालच्या कमिटीच्या रिपोर्टांत असें स्पष्ट वाक्य आहे कीं, " नुसतीं वचनें देऊन तीं पूर्ण न करतां लोकास फसवा-वयाचें अशा आरोपाला ब्रिटिशसरकार सर्वस्वी पात्र आहे" Duke of Argyll ह्यांनीं असें म्हटलें आहे कीं, " ब्रिटिशसरकारला अब्रूची व सत्याची बिलकुल चाड नाहीं" Lord Salisbury यांनींही असेच उद्गार काढले आहेत ज्या ॲंग्लो इंडियनांच्या दानतीबद्दल त्यांच्या प्रत्यक्ष स्वबांधवांकडून असले शेरे मिळतात त्यांनीं लोकांच्या दानतीविषयीं बोलणें किती हास्यास्पद आहे !

आज दीडशें वर्षे हिंदी लोकांनीं सर्व गोष्टी मुकाट्यानें सहन केल्या. परंतु आता त्यांच्या डोळ्यावरील भूल नाहींशी झाली आहे. पूर्वीचे दिवस आतां सरले. जोरानें चळवळ करणारा नवा हिंदुस्थान आता उदयास आला आहे, व त्याच्या प्रयत्नांस यश मिळाल्याखेरीज राहणार नाहीं "

" नवा " हिंदुस्थान आतां उदयास आला आणि या 'नव्या हिंदुस्थानानें' जोरानें कार्य पुढें ढकललें तर यश मिळाल्याशिवाय राहणार नाहीं याविषयीं दादाभाईस अधिकाधिक विश्वास वाटूं लागला. यापुढें सुधारणाकरितां नुसती भिक्षा मागून चालणार नाहीं, सारखी Agitation चळवळ सुरू ठेविली पाहिजे, असा उपदेश त्याच्याकडून अधिक प्रमाणावर होऊ लागला शिवाय, चळवळ करावयाची तीसुद्धा अमकें एक खातें सुधारण्यासाठीं किंवा तमका एक अन्याय दूर करण्यासाठीं अशी ठिगळाठिगळाची नव्हे तर एकदम 'स्वायत्तते'-साठीं झाली पाहिजे असें ते म्हणूं लागले नुकत्याच उदयास आलेल्या 'नव्या हिंदुस्थानानें' आता काय केलें पाहिजे याविषयींचें आपलें मत त्यांनीं नामदार गोखले यास लिहिलेल्या एका पत्रात प्रगट केलें आहे सन१९०५सालची कॉंग्रेस बनारस येथें व्हावयाची होती व दादाभाईनीं त्या कॉंग्रेसला हजर राहावें अशी सर्वांची इच्छा होती परंतु दादाभाईस इग्लंडहून येतां आलें नाहीं, म्हणून कॉंग्रेसचें अभिनंदन करण्यासाठीं नोव्हेंबर ता २६ रोजीं त्यांनीं नामदार गोखले यांस एक पत्र धाडलें त्यांत ( पृष्ठें ६६९ ते ६७२, नटेसन २ री आवृत्ति ) ते लिहितात—

" अगदीं आज करावयास पाहिजे अशी गोष्ट म्हटली म्हणजे पांच सहा कार्यक्षम, नि.स्वार्थी व विद्वान् अशा हिंदी माणसांनीं इंग्लंडात कायमचें राहून येथील कॉंग्रेस कमिटीचें काम चालविलें पाहिजे वर्तमानपत्रें व व्याख्यानें या साधनांचा उपयोग करून त्यांनीं इंग्लडमध्यें हिंदुस्थानविषयक चर्चा जिकडे तिकडे पसरली पाहिजे काळ असा आला आहे कीं, हिंदी लोकांनीं वाटेल तो आत्मयज्ञ करावयास तयार झालें पाहिजे असले आत्मयज्ञ करूनच इंग्लिश लोकांनीं सत्ता मिळविली आहे तीस कोटी लोकाच्या कल्याणासाठीं आपल्याला मरावयाचें आहे हें प्रत्येक पुढाऱ्यानें मनांत वागविलें पाहिजे. आपल्याला आपले जन्मसिद्ध व आश्वासित हक्क मिळवावयाचे आहेत, आपल्याला वसाहतीं-सारखें स्वराज्य मिळवावयाचें आहे, ही गोष्ट प्रत्येक हिंदी मनुष्याच्या मनांत

मिनली पाहिजे. तुस्तेच तीन दिवसांपूर्वी सर हेनरी कॅंपबेल बॅनरमन म्हणाले कीं, "सुराज्याला स्वराज्याची सर कधींच यावयाची नाहीं" हें ध्येय साधण्यासाठीं कॉंग्रेसचें सामर्थ्य आटोकाट वाढविलें पाहिजे आणि प्रत्येकानें आपापल्या प्रयत्नाची परमावधि केली पाहिजे."

आज पन्नास वर्षे श्रम करून जे विचार आपल्या मनांत दृढ झाले आहेत ते देशबांधवास व राज्यकर्त्यांस स्पष्टपणें बोलून दाखविण्याची साधि केव्हां मिळेल असें आतां दादाभाईंस होऊन गेलें होतें हिंदुस्थानच्या हितासाठीं खटपट करण्यात आपण यत्किंचितही कसूर केली नाहीं हें

**सुराज्य नव्हे स्वराज्य मागा**

खरें, पण चुकलेल्या वाटसरूप्रमाणें आपले प्रयत्न विफल झाले, आता आपल्याला खऱ्या मार्गाचें ज्ञान झालें आहे, तेव्हा इतर पुढाऱ्याना व सामान्य जनतेला योग्य मार्ग दाखवून द्यावा, आणि त्याची दिशाभूल होणार नाहीं अशी आपण काळजी ध्यावी असें दादाभाईंच्या मनात रात्रंदिवस घोळूं लागलें कित्येक वर्षांच्या तपानंतर एखादी सिद्धि मिळाल्यावर त्या सिद्धीचें लोकास ज्ञान करून देऊन त्यांचें कल्याण करण्यास उत्सुक असलेल्या तपस्व्याची जी स्थिति होते, किंवा अहर्निश श्रमानीं रक्ताचें पाणी करून एखादा शोध लाविला कीं, शास्त्रज्ञाची जी स्थिति होते, ती स्थिति दादाभाईंची झाली हिंदी लोकाच्याही मनात त्या वेळीं राजकीय चळवळीची लालसा उत्पन्न झाली असल्यामुळें त्यास कोणी तरी मार्गदर्शक पाहिजे होता कर्झनशाहीच्या तडाक्यामुळें हिंदी लोक जागे झाले, कांहीं तरी केलें पाहिजे असें त्यास वाटू लागलें, व काय केलें पाहिजे हें सागण्यास दादाभाईच समर्थ आहेत अशी त्याची खात्री होती म्हणून सन १९०६ सालच्या कॉंग्रेसचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याची लोकानीं दादाभाईंस विनति केली पन्नास वर्षांचा तुमचा अनुभव आम्हास कळू द्या व आता कोणत्या दिशेनें आम्ही जाऊं म्हणजे या भारत देशाचा भाग्योदय लवकर होईल तें आम्हाला सागा, अशी जणुं काय हिंदी लोकानीं दादाभाईंची प्रार्थनाच केली दादाभाईनीं स्वबांधवांची विनंति मान्य करून सन १९०६ सालीं कलकत्ता येथें भरलेल्या बाविसाव्या राष्ट्रीय सभेंत आपलें अंतःकरण लोकांपुढें उघडें केलें. त्या वेळचें त्यांचें भाषण चिरस्मरणीय आहे. सर्वांस ऐकूं जाईल इतकें मोठ्यानें बोलणें दादाभाईंस शक्य नसल्यामुळें त्यांचें भाषण नामदार गोखले यांनीं वाचलें. भाषणाच्या अग्रभागीं

'स्वराज्याला स्वराज्याची सर कधींच येणार नाहीं' हें सर बॅनरमन यांचें वाक्य उध्दृत केलें होतें व भाषणाचा ( पृष्ठें ६५ ते ९६, नटेसन २ री आवृत्ति ) साराश हा होता—

" हिंदुस्थानात सत्तेची प्राप्ति इंग्रजाना प्रथम ज्या दिवशीं झाली त्या दिवशीं ब्रिटिश मुत्सद्दयानीं ईश्वराची शपथ घेऊन जाहीर केलें कीं, आम्ही हिंदी लोकांना ब्रिटिश प्रजाजनाप्रमाणे वागवू राणीच्या जाहीरनाम्यांतही याच प्रतिज्ञेचा पुरस्कार केला गेला मग आम्ही जर ब्रिटिश प्रजेपेक्षां यत्किंचित् देखील कमी योग्यतेचे नाहीं तर ब्रिटिश लोकांस असलेले सर्व अधिकार मागण्याचा आम्हास हक्क आहे ते हक्क हे कीं, प्रथम युनायटेड किंगडममधील लोकाप्रमाणें आमच्या देशाच्या कारभाराचीं सर्व खातीं आमच्या हातीं पाहिजेत शिवाय, कर बसविणें, कायदे करणें व त्याचा अम्मल बजाविणें या गोष्टी आमच्या ताब्यांत आल्या पाहिजेत. त्याचप्रमाणे इंग्लंड व हिंदुस्थान यांमधील पैशाचा व्यवहार अगदीं न्यायानें झाला पाहिजे थोडक्यात सांगावयाचें म्हणजे " युनायटेड किंगडममधील किंवा वसाहतींतील लोक ज्या स्वराज्याचा उपभोग घेतात तें स्वराज्य आम्हांस पाहिजे "

सध्याची राज्यपद्धति एकदम अजिबात बदलणें शक्य नाहीं परंतु खालीं नमूद केलेले हक्क हिंदी प्रजेला अगदीं आज देऊन टाकून सरकारनें आमच्या स्वराज्याला प्रारंभ करावा.

[१] हिंदी लोकास वरिष्ठ नोकऱ्या देण्याबद्दल अभिवचनें, पार्लमेंटचे कायदे सर्व कांहीं झालें आहे त्या दिल्याच पाहिजेत अशाबद्दल लॉर्ड मेकॉलेसारख्या मुत्सद्दयानीं ओरड केली आहे म्हणून त्या नोकऱ्या हिंदी लोकांस ताबडतोब मिळाव्या.

[२] प्राथमिक शिक्षण मोफत व सक्तीचें होऊन वरिष्ठ शिक्षण मोफत व्हावें

[३] आम्ही नालायक आहों या मुद्दयावर आज १५० वर्षें पार्लमेंटचीं दारें आम्हांस बंद ठेविलीं गेलीं. आतां हें चालणार नाहीं. आमच्या हातीं काम आलें म्हणजे आमच्या अंगीं लायकी आपोआप येईल.

[४] केवळ आमच्या पैशावर सैन्य व आरमार पोसण्याच्या सरकारच्या पद्धतीनें आम्ही मरत आहों. ही पद्धत बंद झाली पाहिजे आणि सरकारला सद्-सद्विवेकबुद्धि व चाड असेल तर ही पद्धति या घटकेला बंद करणें शक्य आहे.

गेल्या पन्नास वर्षांच्या अनुभवानंतर इंग्रज लोक आम्हांस कांहीं अधिकार खुषीनें देतील असें वाटण्याइतका इंग्रज लोकाविषयींचा विश्वास तुमच्या मनांत खरोखरच आहे काय, असा प्रश्न आताशा पुष्कळ लोक मला विचारतात. सन १८५२ सालीं मी राजकीय चळवळीला प्रारंभ केला, व त्या वेळीं बॉंबे प्रेसिडेन्सी ॲसोसिएशन स्थापण्याच्या प्रसंगीं केलेल्या एका लहानशा भाषणांत माझ्या मनांतील इंग्रज लोकांच्या न्यायप्रियतेबद्दलचा विश्वास मीं बोलून दाखविला. परंतु, त्यानंतर माझ्यावर निराशेचे इतके प्रसंग आले आहेत कीं, माझें अंतःकरण फुटून जाऊन मीं बंड उभारलें तर त्यांत मला आश्चर्य वाटणार नाहीं.

साधारणपणें एखाद्यानें कांहीं प्रयत्न केला व त्यांत त्याला अपयश मिळालें कीं, त्याला निराशा वाटते, परंतु मला जे निराशेचे प्रसंग सोसावे लागले ते असे साधे नव्हते. अनेक वेळा झगड्यामध्यें यशस्वी होऊनही यशाचें फल इंग्रज अधिकाऱ्यांनीं माझ्या पदरांत पडूं दिलें नाहीं, आणि अशा प्रसंगीं मला जी निराशा अनुभवावी लागली तीमुळें एखाद्याचें मन भ्रमून वेडें झालें असतें.

परंतु अजूनही माझा पुरा निरुत्साह झालेला नाहीं. इंग्रजी भाषेंतील 'Persevere' 'निश्चयाचें बळ' या शब्दाकडे पाहिलें कीं, मला पुन्हा स्फुरण चढतें. आपण अव्याहत चळवळ केली पाहिजे. 'चळवळ' म्हणजे इंग्रज लोकांचें जीवन होय, व त्यांजपासून आपण चळवळीचा धडा शिकला पाहिजे. कामकरी पक्षाचे, आयर्लंडमधील जहाल पक्षाचे, व रॅडिकल पक्षाचे पार्लमेंटांतील सभासद, आणि Daily News, Tribune, Manchester Guardian, Star, Daily Chronicle, व New Age वगैरे पत्रें हिंदुस्थानचा कैवार घेऊं लागलीं आहेत. अशा वेळीं आपण अतिशय मोठ्या प्रमाणावर चळवळ सुरू करून तिला पळभरही खंड पडूं देतां कामा नये. विद्वान् व उत्साही वक्त्यांचा एक संघ स्थापन करून हिंदुस्थानच्या अगदीं कोनाकोपऱ्यांतील लोकांपर्यंत राजकीय चळवळीची लाट पोंचविली पाहिजे. शिवाय, कांहीं वक्त्यांनीं इंग्लंडमध्यें जाऊन कार्य सुरू करणें आवश्यक आहे. हिंदुस्थानांतील सर्व जातींच्या व सर्व दर्जांच्या लोकांनीं या राजकीय चळवळीच्या कामासाठीं एकदिलानें वागलें पाहिजे. 'हिंदु व मुसलमान हे हिंदुस्थानचे दोन नेत्र आहेत; एकाला दुखापत झाली कीं दुसऱ्याला इजा झालीच' हे सर सय्यद अहमद यांचे शब्द फार मननीय आहेत.

सामाजिक, औद्योगिक वगैरे सर्व सुधारणांच्या मुळाशीं राजकीय सुधारणा आहे, आणि 'स्वराज्या'शिवाय दुसरी कोणतीही राजकीय सुधारणा आम्हांस पुरेशी नाहीं आमच्या आशा, आमची शक्ति, आमचा मोठेपणा, सर्व कांहीं 'स्वराज्यां'त आहे

कलकत्त्याची राष्ट्रीय सभा आटोपून दादाभाई आपल्या आप्तमित्रांसह १४ जानेवारी १९०७ रोजीं मुंबईस परत आले फार वेळ न घालवितां इंग्लंडला जावयाचा त्यांचा बेत होता परंतु त्यांच्या नातलगांना व मित्रांना त्यांचा हा बेत पसत नव्हता आता त्यांचें वय ८२ च्या वर होतें म्हातारपणचा थकवा त्यांच्या शरिरावर स्पष्टपणें दिसत होता, व इंग्लंडला जाण्याचा खटाटोप आणि पुन्हा तेथें काम करण्याची दगदग त्यांना मुळींच सहन होणार नाहीं हें कोणींही सांगितलें असतें म्हणून इंग्लंडला जावयाच्या इच्छेपासून दादाभाईंना परावृत्त करण्याची सर्वांनीं शिकस्त केली परंतु, दादाभाईंनीं आपला हट्ट सोडला नाहीं त्यांचें सारख म्हणणें हेंच कीं, इंग्लंडमधील British Congress committeeचें पुष्कळ काम राहिलेलें आहे, आणि तिकडे जाऊन तें काम पुरें केल्याखेरीज माझ्यानें राहवणार नाहीं शेवटीं त्यांच्या इच्छेला विरोध करण्याचें इतरांनीं सोडून दिलें, व दादाभाई इंग्लंडला गेले

दोन अडीच महिने दादाभाईंची प्रकृति बरी होती, व त्यांच्या हातून काम होत होतें परंतु मार्च महिन्यांत ते एकदम आजारी पडले व जुलईच्या सुमारास त्यांची प्रकृति इतकी ढासळली कीं, आता दादाभाई लवकरच इहलोक सोडणार असें सर्वांस वाटूं लागलें दादाभाईंसही आपला मृत्यु स्पष्ट दिसूं लागला, व ते म्हणूं लागले कीं, 'मला हिंदुस्थानांत नेऊन टाका' डॉक्टरांचें मत पडलें कीं, प्रवासाचा शीण दादाभाईंच्या शरिरास बिलकूल सहन होणार नाहीं मित्रमंडळीही दादाभाईंस इंग्लंडांत राहण्याचा आग्रह करूं लागली, परंतु दादाभाईंनीं अगदीं निक्षून सांगितलें कीं, 'मला माझ्या देशांत जाऊन मरूं द्या, या बाबतींत माझें मन वळविण्याचा जो प्रयत्न करील त्याला मी शत्रु समजेन, माझ्या अस्थि माझ्या परमप्रिय मायभूमींतच पडल्या पाहिजेत'. म्हणून दादाभाईंस हिंदुस्थानांत आणणें भाग पडलें ७ नोव्हेंबर सन १९०७ रोजीं दादाभाई मुंबईस आले व त्यांस त्यांचे जांवई होमी दादीना यांनीं वरसोवा येथील आपल्या घरीं नेलें.

वरसोवा येथें आल्यानतर प्रथम दादाभाईंची नात डॉक्टर मेहेरबाई हिच्या देखरेखीखालीं त्याच्या औषधोपचाराची व्यवस्था चालली होती नतर नोकरी-निमित्त मेहेरबाई वरसोवा सोडून गेली आणि दादीनाच्या पत्नी डॉ० माणिक-बाई यांनीं दादाभाईंच्या शुश्रूषेचें काम पत्करले विशेष औषधपाण्याचा उपयोग न करता केवळ प्रेमळ शुश्रूषा, साधें अन्न आणि अत्यत नियमित व्यवहार याच्या साहाय्यानें दादाभाईंस बरें करण्याचें माणिकबाईंनीं योजिले; व त्यांची योजना इतकी यशस्वी झाली कीं, पुढें दहा वर्षें दादाभाईंची प्रकृति अगदीं लख्ख राहून साठ सत्तर वर्षांच्या परिश्रमानतर अगदीं अवश्य असणारी अभंग विश्रांति दादाभाईंस उपभोगिता आली याचें सर्व मंडळींस महदाश्चर्य वाटलें.

सन १९०८ पासून पुढें, म्हणजे वरसोवा येथें येऊन राहिल्यापासून दादा-भाईंनीं कोणत्याही राजकीय किंवा सामाजिक चळवळींत प्रत्यक्ष भाग घेतला नाहीं सर्व प्रकारच्या सस्था व मडळें दादाभाईंचा सल्ला घ्यावयास वरसोवा येथें जात असत, व सर्वांना उत्तेजन देऊन कार्यप्रवृत्त

**वरसोवा येथें**

करण्यांत दादाभाईंस आनद होत असल्यामुळें सन १९०८ पासून आठ नऊ वर्षें वरसोवा म्हणजे एक यात्रेच्या स्थल" सारखेंच ठिकाण होऊन गेलें होतें परंतु सल्ला देण्यापलीकडे दादाभाईंनीं कोणत्याही कार्यांत लक्ष घातले नाहीं त्यांनीं आपला जीवनक्रम शक्य तितका शांत आणि नियमबद्ध केला होता सकाळीं लवकर उठण्यापासून तों रात्रीं दहा वाजता निजण्यापर्यंत प्रत्येक गोष्ट ते इतक्या नियमित रीतीनें करीत कीं, वरसोव्याचे रहिवासी आपलीं घड्याळें लावीत असत

सन १९०९ सालीं मोर्ले-मिंटोच्या सुधारणाचा सगळ्या हिंदुस्थानभर गाजा-वाजा चालला होता तेव्हां हिंदुस्थानात कोणत्या सुधारणा अवश्य आहेत त्याचें खुलासेवार दिग्दर्शन करणारें एक पत्र दादाभाईंनीं तयार केलें व तें मोर्लें व मिंटो याजकडे पाठविलें पुढें सन १९१० सालीं जे कमिशन बसलें त्या कमिशनच्या सर्व सभासदांना या पत्राच्या प्रती पाठविण्यांत आल्या आणि शिवाय सन १९१२ सालीं जेव्हां लॉर्ड क्रयू हिंदुस्थानांत आले तेव्हां त्यास व लॉर्ड हार्डिंज यांस हेंच पत्र सुधारून दादाभाईंनीं धाडलें. तेव्हा त्या वेळचे स्टेट सेक्रेटरी लॉर्ड चेंबरलेन व चेल्म्सफर्ड यांस तें पत्र रवाना करण्याचा दादाभाईंचा इरादा होता, पण बऱ्याच मित्रांच्या सल्ल्यावरून त्यांनीं तो बेत रहित केला.

सन १९१५ मध्यें नामदार गोखले मृत्यु पावले. या बातमीनें दादाभाईंचें अंतःकरण विदीर्ण होऊन त्या दुःखाचा त्याच्या प्रकृतीवरही परिणाम झाला असावा. नामदार गोखले याजवर दादाभाईंचें फार प्रेम होतें. राजकीय चळवळींत नामदार गोखल्यांनीं त्याच्याबरोबर अनेक प्रसगीं काम केलें होतें, व दादाभाई नेहमीं म्हणत कीं, हिंदुस्थानच्या सर्व दुःखाच्या मुळाशीं दारिद्य आहे. आणि हिंदुस्थानची खरी उन्नति करावयाची म्हणजे या दारिद्याला कारणीभूत असलेल्या सर्व गोष्टींचा उच्छेद केला पाहिजे, हें मूलभूत तत्त्व नामदार गोखले याच्याइतकें दुसऱ्या कोणासही समजलेलें नाहीं. गोखल्याच्या हातून पुष्कळ देशकार्य होईल अशी दादाभाईस आशा वाटत असल्यामुळें त्याच्या मृत्यूच्या बातमीनें त्याच्या मनाच्या व शरीराच्या सामर्थ्यावर आघातच केल्यासारखें झालें. थोड्याच दिवसांनीं सर फेरोजशहा मेथा वारले. मेथा यांस तर दादाभाईनीं लहानपणापासून वाढविलें होतें व मेथाच्या राजकीय व इतर चळवळींतील बाणेदारपणा व तडफ हीं पाहून त्यास अतिशय आनंद होत असे. तेव्हा मेथास मृत्यु आलेला पाहून दादाभाई शोकाकुल झाले यांत नवल नाहीं.

तरी सन१९१७च्या मे महिन्यापर्यंत दादाभाईची प्रकृति चांगली होती. परंतु २९ मे रोजीं त्याची तब्येत एकदम बिघडली, व ती इतकी बिघडली कीं, त्यास वरसोव्याहून मुंबईस आणावें लागलें. तेव्हापासून रोज ते अधिकाधिक क्षीण होत चालले. त्याची सर्व आप्तमंडळी त्यास भेटण्यासाठीं मुंबईस आली. शेवटीं एक महिन्याच्या आजारानंतर ता. ३० जून सन १९१७ रोजीं दादाभाई स्वर्गस्थ झाले. या आपल्या मायभूमींतील शेवटचा श्वासोच्छ्वास घेतांना त्याच्या मनांत काय विचार आले असतील! आपला देश असाच दास्यगर्तेत पडून राहाणार काय! अशी शंका क्षणभर मनांत येऊन त्याच्या अंतःकरणास पीळ पडला असेल! किंवा, आपल्या मरणानंतर तरी या अभागी देशाला सुखाचे दिवस लाभोत अशी प्रार्थना करण्यासाठीं त्याची चित्तवृत्ति क्षणभर परमेश्वराकडे वळली असेल! किंवा, पुनर्जन्मावर त्यांचा विश्वास असल्यास देशकार्य करण्यास त्याच देशांत पुन्हा जन्म घेण्यासाठीं तळमळणाऱ्या त्याच्या आत्म्याची दृष्टि पुढच्या जन्माकडे धांवली असेल!

प्रकरण आठवें

# दादाभाईचें कार्य

दादाभाईंचा नश्वर देह नाहींसा झाला, परंतु त्या देहांत ९२ वर्षें केंद्रीभूत झालेल्या शारीरिक व मानसिक शक्तींनीं जें अलौकिक कार्य केलें त्या कार्याला विनाशकालच नाहीं दादाभाईंनीं समाजाची व राष्ट्राची जी सेवा केली ती खरोखरच अपूर्व होय त्यांचें कार्य इतकें विविध होतें कीं, हिंदुस्थानविषयक अमुक एक प्रश्न त्यांच्या चळवळीच्या कक्षेबाहेर राहिला असें झालें नाहीं. सामाजिक, धार्मिक, राजकीय--सर्व प्रश्नांची चर्चा अंगावर घेऊन त्यांनीं बहुजन समाजास मार्ग दाखविला 'विविधता' ही त्यांच्या कार्यांतील विशेष गोष्ट होती त्यांनीं सामाजिक सुधारणेस स्त्रीशिक्षणापासून प्रारंभ ज्या वेळीं केला त्या काळांतील लोकांची मनःस्थिति लक्षांत घेतली म्हणजे त्यांच्या प्रयत्नांचें महत्त्व चटकन् पटतें त्यांनीं सुरू केलेली मुलींची शाळा फार अवाढव्य किंवा अगदीं नमुनेदार, किंवा पूर्ण दोषरहित होती असें मुळींच नव्हे परंतु कोणत्याही सुधारणेचा प्रारंभ होणेंच फार कठीण असतें. ती सुधारणा लोकांच्या डोळ्यांस परिचित झाली म्हणजे मग त्या सुधारणेचें पाऊल पुढें पडण्यास अवधि लागत नाहीं गगनचुंबी इमारत ज्यांच्या आधारावर उभी असते ते मोठमोठे दगड पायाच्या भगदाडांत गडप होऊन लोकांच्या दृष्टीला दिसेनासे होतात. पण त्यांचें महत्त्व केवढें असतें! हीच गोष्ट दादाभाईंच्या सामाजिक कार्याची आहे. आज स्त्रीशिक्षणाच्या बाबतींत मुंबई शहर किती पुढें गेलेलें आहे! पण या विस्तीर्ण प्रवाहाच्या गंगेचा उगम कोठें झाला, याचा आपण विचार करूं लागलों तर २४-२५ वर्षांच्या उमेदींतील, सामाजिक विषयांची चर्चा करण्यासाठीं सहाध्यायाशीं आवेशानें बोलणारे, आपल्या उद्योगास सहानुभूति मिळविण्यासाठीं सर जमशेटजींसारख्या बड्या पुढाऱ्याच्या घरीं हेलपाटे घालणारे, असे दादाभाई आपल्या डोळ्यांसमोर उभे राहतात लोकमताच्या विरोधी प्रवाहाशीं टक्कर देऊन त्या प्रवाहास आपल्या बाजूला वळविणाऱ्या पहिल्या पुढाऱ्याची किंमत मागाहून येणाऱ्या शेंकडों कार्यकर्त्यांपेक्षा अधिक असते. दादाभाईंनीं स्त्री-शिक्षणाची, धार्मिक आचाराच्या चर्चेची, आणि स्त्री-पुरुषां

तील परस्पर व्यवहार अधिक श्लाध्य व हितकारक करण्याची दिशा समाजास प्रथम दाखविली त्यांनीं 'रास्त गोफ्तार' नांवाचें जें वर्तमानपत्र सुरू केलें त्यामुळें समाजाचें पाऊल एकदम किती तरी पुढें पडलें ! मुक्या असलेल्या समाजाला जणुं त्यामुळें वाचा फुटली. समाजांतील विद्वान् माणसांच्या सुविचाराचा ओघ कोंडून न राहतां सर्व स्त्रीपुरुषांत पसरूं लागला स्वराज्य गमावून गजत पडलेल्या हिंदी लोकांच्या जीवनावरील गंज उडून जाऊन नव्या काळाची झुळुक लागल्यामुळें समाजातील अंतःकरणें जागृत होऊं लागलीं याचें सर्व श्रेय दादाभाईंस आहे इंग्रजी राज्यामुळें सुरू झालेल्या नवयुगात रहावयास योग्य होण्यासाठीं हिंदी लोकांच्या राहणींत व विचारसरणींत काहीं बदल होणें अत्यंत अवश्य होतें. फरक घडवून आणण्यासाठीं जे जे प्रयत्न झाले व होत आहेत त्या सर्वांचा उगम दादाभाईंच्या सामाजिक कार्यांत दृष्टीस पडतो कोणतेंही कार्य हातीं घेतलें तरी तें करतांना अमुक एका समाजाचे आपण प्रतिनिधि आहों, आणि त्या दृष्टीनें जग आपल्याकडे पहात असेल ही भावना दादाभाईंच्या मनात सदैव जागृत असे अशा भावनेनें वागूनच त्यांनीं पार्शी समाजाचा, किंबहुना सर्व हिंदी लोकांचा दर्जा वाढविला सबंध राष्ट्राची पत वाढविणें यापेक्षां अधिक मूल्यवान सामाजिक सेवा कोणती असणार ? दादाभाई व्यापारासाठीं इग्लंडांत गेले तेव्हा त्यांनीं हिंदुस्थानची केवळ औद्योगिक स्थितिच सुधारली असें नव्हे तर हिंदी समाजाविषयीं अत्यत उच्च मत विलायतेंतील लोकांत त्यानीं उत्पन्न केलें इग्लडांत व्यापार करतांना केवळ पैसा कमावण्याच्या आकुंचित दृष्टीनें दादाभाई मुळींच वागले नाहींत. आपणांमागून येणाऱ्या हिंदी व्यापाऱ्याचा मार्ग सुलभ व्हावा, हें त्यांचें ध्येय होतें इंग्लंडांतील गिरणीवाल्यांच्या लबाड्या पूर्ण माहीत होऊन त्या लबाडीच्या जाळ्यांत हिंदी व्यापारी सापडतां कामा नये, हिंदी व्यापारी म्हटला कीं तो अत्यंत सचोटीचा व विश्वसनीय असतो अशी कल्पना व्यापारीवर्गांत पसरली पाहिजे, आणि हिंदी व्यापारी केवळ पैशासाठीं धडपड करीत नसून त्यांच्या मनांत अब्रूची चाड व राष्ट्राभिमान सदैव वसत असतात अशी सर्वांची खात्री झाली पाहिजे, अशा धोरणानें दादाभाईंनीं व्यापार केला आणि वीस वर्षांच्या व्यापारी पेशानें त्यांनीं आपल्या बांधवांची औद्योगिक व सामाजिक दृष्ट्या केवढी तरी उन्नति केली.

हिंदी संस्थानिकांच्या बाबतींत दादाभाईंनीं जी कामगिरी केली ती तर इतकी

महत्त्वाची आहे कीं, तें महत्त्व जर आमच्या संस्थानिकांना खरोखर समजेल तर दादाभाईंचें स्मारक करण्यासाठीं या संस्थानिकांच्या तिजोरींतून क्रोडों रुपये बाहेर पडतील हें महत्त्व सूचित करण्यासाठींच दादाभाईंची बडोद्यातील कारकीर्द विशेष विस्तृतपणे प्रस्तुत चरित्रात देण्यांत आली आहे हिंदी संस्थानें म्हणजे एक मोठी शक्ति असून ती शक्ति सत्कार्यांत खर्च झाल्यास हिंदुस्थानचें अपरिमित हित होईल अशी दादाभाईंची दृढ श्रद्धा होती सबब हिंदी राष्ट्राविषयीं संस्थानिकांस कळकळ वाटली पाहिजे, व ती त्यांना वाटावयास लावण्याचा सर्वांत उत्तम मार्ग म्हणजे खालसा मुलुखातील लोकांनीं त्यास मदत करण्याची तत्परता दाखविणें हा होय, असें दादाभाई नेहमीं प्रतिपादन करीत, व आपल्या प्रतिपादना-प्रमाणें त्यांनीं आपलें वर्तनही सबब आयुष्यभर ठेविलें संस्थानाविषयीं एखादी अन्यायाची गोष्ट सरकार करू लागलें, कीं दादाभाई सतापून जात व ते आपण होऊन संस्थानचा कैवार घेऊन पुढें सरसावत देशी संस्थानांविषयीं त्यांना फार आस्था वाटे व ते म्हणत कीं, खालसा मुलुखातील प्रजा व संस्थानिक यांचा एक-दिल होण्यासाठीं हरप्रयत्न झाले पाहिजेत हेंच तत्त्व डोळ्यापुढें ठेवून त्यांनीं कच्छच्या महारावाचें काम केलें, बडोद्याची दिवाणगिरी स्वीकारली आणि म्हैसूर संस्थानच्या बाबतींत खटपट केली. मल्हाररावाच्या स्वातंत्र्यासाठीं दादाभाईंनीं जो झगडा केला त्याचा विचार केला म्हणजे तर असें वाटतें कीं, त्या वेळीं बडोद्यांत दादाभाई नसते तर मल्हाररावांची काय दुर्दशा झाली असती कोण जाणे! बडोदें संस्थान कदाचित् खलासही झालें असतें कारण, बडोदें संस्थानच्या वृक्षावर सरकारच्या कोपाचें वादळ झालें होतें. तो वृक्ष समूळ उन्मळून पडतो कीं काय असें त्या वेळीं सर्वांना भय वाटत होतें त्या वृक्षाच्या रक्षणासाठीं व संवर्धनासाठीं त्या वेळीं दादाभाईंनीं आपल्या रक्ताचें पाणी केलें म्हणूनच आज घटकेला भरभराटीला स्थिति उपभोगिण्यास बडोदें संस्थान जिवंत राहिलें. संस्थानाची इतकी अमोलिक कामगिरी करूनही दादाभाईंनीं जी निरपेक्ष वृत्ति ठेविली होती ती पाहून अंतःकरण सद्गदित होतें. किंबहुना, त्यांनीं निरपेक्ष वृत्ति ठेविली म्हणूनच त्यांच्या कार्यांत एक प्रकारचें विलक्षण तेज आलें होतें 'पैशासाठीं' किंवा 'कीर्तीसाठीं' हे शब्दच दादाभाईंस माहीत नव्हते. संस्थानाविषयीं त्यांना जी आपलेपणा वाटे त्याच्या भरातच त्यांनीं असें कार्य केलें कीं, संस्थानिक म्हणजे केवळ भातुकलींतील खेळणीं आहेत अशी जी कल्पना सरकारी अधि-

काऱ्याच्या मनात वाढत होती तिचा त्यांनीं पुरता नायनाट केला, व संस्थानांविषयीं एक प्रकारचा आदर व दरारा उत्पन्न केला

" हिंदी लोक लेचेपेचे, शेणाचे गोळे नसून प्रसंग आल्यावर वज्राहूनही कठिण होतात " हें इंग्रज लोकास सिद्ध करून पटवून द्यावयासाठींच जणु काय दादाभाईचा अवतार झाला होता मुबईच्या कार्पोरेशनमध्यें काम करतांनाही त्यांनीं इंग्रज अधिकाऱ्यास पुरतें नरम आणलें विहार तलावाच्या योजनेच्या वेळीं दादाभाईमुळे कार्पोरेशनमध्यें असा काहीं जोर आला होता कीं, शेवटीं इंग्रज अधिकारी हार खावयास तयार झाले आणि गरीब मुबईकराचे लाखो रुपये वांचले.

' राजकीय बाबतीत दादाभाईनीं काय केलें असें विचारण्यापेक्षां त्यांनीं काय करावयाचें शिल्लक ठेविलें हाच प्रश्न अधिक योग्य होईल दादाभाई तारुण्यांत प्रविष्ट झाले त्या वेळीं काहीं हिंदी लोक गत सामर्थ्याच्या शोकानें विव्हळत होते व बाकीचे लोक भ्रममूलक सुखात मग्न झाले होते या सर्वांना जागृत करून नामशेष होण्याच्या पथास लागलेली राष्ट्रीय भावना जतन करून वाढविण्याचें सर्व श्रेय दादाभाईस आहे नवयुगातील राजकीय चळवळीच्या मार्गांत प्रथम पाऊल टाकणारे दादाभाई त्याना वाट माहीत नव्हती, त्यांस वाटाड्या मिळाला नव्हता, वाटेंतील काटे बाजूला करून प्रत्येक पाऊल पुढें टाकताना प्रथम जागा साफसूफ करून घेणे भाग होतें इंग्रज अधिकाऱ्यांच्या विरोधालाही वाण नव्हती इतकें असूनही दादाभाईनीं धैर्यानें प्रारंभ करून येवढें प्रचंड कार्य केलें कीं, हिंदी राजकीय चळवळीचा मार्ग म्हणजे अगदीं राजमार्ग होऊन निष्कंटक नाहीं तरी अगदीं पूर्ण स्पष्ट झाला आहे शिवाय, दादाभाईच्या कार्यामुळें हिंदी राजकारणांतील एक तत्त्व इतकें उघड झालें आहे कीं, त्याविषयीं आता कोणीही शंका बाळगण्याचें कारण नाहीं परकी अमलाखालीं असणाऱ्या कोणत्याही देशाला स्वातंत्र्य मिळावयाचें म्हणजे त्या देशाच्या पुढाऱ्यांनीं तीन मार्गांपैकीं एका मार्गाचा अवलंब केला पाहिजे राज्यकर्त्यांपैकीं शेलक्या लोकांची मर्जी संपादून, त्यांच्याशीं वादविवाद करून, त्यांची खात्री पटवून, आपलें गाऱ्हाणें त्यांस सांगून, स्वातंत्र्य देण्याविषयीं त्यास विनवणी करावयाची–हा एक मार्ग. याला 'दरबारी' मार्ग म्हणतां येईल किंवा, राज्यकर्त्यांच्या लोकपक्षाचें पाठबळ मिळवून आपल्या लोकांची चळवळ सबळ करून आपलें कार्य साधावयाचें.

याला 'चळवळी'चा मार्ग म्हणतां येईल. किंवा, बड उभारून स्वातंत्र्य मिळवावयाचें. हा अत्याचारी' मार्ग होय 'अत्याचारी' मार्ग स्वीकारण्याचें कोणत्याही सुज्ञ व पुढारी या नावास योग्य अशा हिंदी माणसाच्या मनात कधींच आलेलें नाहीं परतु 'दरबारी' मार्गानें प्रयत्न केल्यास हिंदुस्थानचा भाग्योदय होणें शक्य आहे, या कल्पनेचा आपल्या आयुष्यभर प्रयोग करून पाहून दादाभाईंनीं असें सिद्ध केलें कीं, या मार्गात काहीं अर्थ नाहीं दादाभाईंनीं आपल्या ऐन उमेदींतील दिवस इंग्रज अधिकाऱ्याची खात्री पटविण्यात खर्च केले, मोठमोठ्या इंग्रज लोकांशीं पत्रव्यवहार करण्याच्या कामात त्यानीं रात्रीचे दिवस केले, स्टेट सेक्रेटरीपुढें हिंदुस्थानचें दुखणें माडण्यासाठीं त्यानीं द्रव्य आणि स्वतःचें सामर्थ्य खर्च केलें-परतु, Simultaneous Examinationचें पार्लमेंटमध्यें पास झालेलें बिल जेव्हा लॉर्ड किंबर्ली यानीं कागदाच्या चिटोऱ्याप्रमाणें करून टाकलें, तेव्हा या 'दरबारी' मार्गाचा त्याना पुरता वीट आला या मार्गाची विफलता त्याना दिवसेंदिवस अधिक पटू लागली, व शेवटीं 'जोराच्या चळवळी'खेरीज दुसरा तरणोपाय नाही असा ते सर्वांस उपदेश करू लागले " दरबारी मार्गाचा" अनुभव कोणा तरी हिंदी पुढाऱ्यानें घेणें अवश्य होतें हा अनुभव दादाभाईंनीं घेतला या मार्गाची किंमत करण्यासाठीं त्यानीं तीनचार तपें परिश्रम केले आज घटकेस दादाभाईंच्या कार्याचें अभ्ययन करणाऱ्या हिंदी पुढाऱ्याच्या अंतःकरणात असा विश्वास खात्रीनें उत्पन्न होतो कीं, हिंदी राजकारण 'दरबारी मार्गानें' चालू लागल्यास हिंदी रयतेच्या पदरात वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या गोड भुलथापा व कनिष्ठ अधिकाऱ्याच्या लाथा याखेरीज काहींएक पडणार नाहीं आतां यापुढें हिंदी पुढाऱ्याची दिशाभूल होणें शक्य नाहीं ही दिशाभूल नाहींशी करण्याचें काम दादाभाईंनीं केलें १९०६ सालीं त्यानीं उच्च स्वरानें सर्वांस निक्षून सागितलें कीं, अर्ज करणें, विनवणी करणें, भिक्षा मागणें, असल्या गोष्टी करीत बसाल तर तुमचे सारे श्रम वाया जातील. तुम्हास खरें फलदायी कार्य करावयाचें असेल तर इतकी प्रचंड चळवळ सुरू करा कीं, तुमच्या चळवळीनें दशादिशा व्यापल्या जातील, " Agitate, Agitate and again Agitate"

आणि त्यांच्या उपदेशाप्रमाणें वागून चळवळ करणाऱ्या राजकारणी पुढाऱ्यांसाठीं हिंदुस्थानांत इंग्लंडांत दादाभाईंनीं इतकी तयारी करून ठेविली आहे कीं, कोणत्याही पुढाऱ्यास आतां मी काय करू, कसा वागू, असा संदेह उत्पन्न होण्याचें कारणच

उरलें नाहीं दादाभाई नेहमीं कटाक्षानें सांगत कीं, हिंदी राजकारण हिंदुस्थानच्या मर्यादेच्या बाहेर गेलें पाहिजे, हिंदी लोकांच्या स्थितीकडे इंग्रज जनतेचें लक्ष सारखें वेधून ठेविलें पाहिजे “It is in the Parliament that our battles are to be fought” हें सूत्र ते प्रत्येकाजवळ सांगत कॉंग्रेसच्या प्रत्येक बैठकींत ते बोलून दाखवीत कीं, पांच सहा हिंदी वक्ते इग्लंडांत कायमचे जाऊन राहिले पाहिजेत इंग्लडात जाऊन चळवळ करणाऱ्या हिंदी पुढाऱ्यांच्या कामासाठीं त्यानीं अगदीं उत्तम भूमि तयार करून ठेविली आहे इंग्लडात काम करणाऱ्या हिंदी माणसानें इग्रज जनतेला काय सांगावयाचें, कसें सागावयाचें, कोणत्या सस्थाचें व मडळाचें पाठबळ मिळवावयाचें, इग्रज लोकांच्या अतःकरणातील कोणती भावना जागृत करावयाची, आपली कार्यक्षमता इंग्रजास कशी पटवयाची, त्याच्याजवळ कोणती मदत मागवावयाची, त्याच्या मनात हिंदी लोकाविषयीं सहानुभूति कशी उत्पन्न करावयाची—या सर्व गोष्टी दादाभाईनीं आपल्या जीवनाचा खर्च करून करून ठेविल्या आहेत दादाभाईनीं आपल्या उत्तम चारित्र्यानें, कल्पनातीत परिश्रमानीं, अतःकरणाच्या कळकळीनें, स्पष्टोक्तीच्या सामर्थ्यानें, इंग्रज लोकाचीं अतःकरणें इतकीं काबीज केलीं होतीं कीं, त्यांच्यासारखा स्फूर्तीनें काम करणारा हिंदी गृहस्थ इंग्लडात जावयाचा अवकाश कीं सर्व समाजाची सहानुभूति त्याच्याकडे एकाद्या लोहचुबकाप्रमाणें आवेशानें आकर्षित झाल्याशिवाय राहणार नाहीं हिंदुस्थानाविषयीं आस्था बाळगणारे दहा बारा उदारमतवादी सभासद पार्लेमेंटमध्यें आज दिसत आहेत, हिंदुस्थानच्या स्वातत्र्यासाठीं ब्रिटिश प्रधानमडळापाशीं हट्ट धरणारा मजूरपक्ष आज उत्पन्न होत आहे, हिंदुस्थानचा कैवार घेणारीं सात आठ इंग्रजी वर्तमानपत्रें आज इंग्लंडांत आढळत आहेत, हिंदी लोकाच्या सुखदुःखासाठीं तळमळणाऱ्या चार पांच इग्रजी संस्था आज विलायतेंत काम करीत आहेत—हें सर्व दादाभाईंच्या परिश्रमाचें फल होय “My acquaintance with Dadabhoy's work gave me a passion for India's emancipation” असें म्हणणारे सर चार्लस रॉबर्टस व डॉक्टर क्लिफर्ड यांजसारखे किती तरी ब्रिटिश मुत्सद्दी व पुढारी आहेत. दादाभाईंची परिश्रम करण्याची शक्तिच अचाट होती इ०सन१८५५ पासून सन१९०७पर्यंत ते जाऊन येऊन इंग्लंडांत राहिले, व तेवढ्या अवधींत त्यानीं हिंदी राजकारणानें विलायतेंतील वातावरण व्यापून टाकलें.

इंडिया ऑफिसमध्यें जाऊन रात्रंदिवस खपून त्यांनीं माहिती मिळविण्याचें काम केलें व इतके बिनचूक आंकडे व माहिती गोळा केली कीं, त्यापुढें ब्र बोलण्याची त्यांच्या शत्रूंचीही छाती नव्हती. हिंदी लोकांच्या बाबतींत इग्लंडांत जो अन्याय चालला आहे त्या अन्यायाचें चित्र इग्लंडांतील बहुजनसमाज, संस्था, पुढारी, विद्वान् लोक या सर्वांच्या अंतःकरणांवर इतक्या ढळढळीतपणें दादाभाईंनीं रेखाटून ठेवलें आहे कीं, तो मूळ अन्याय नाहींसा झाल्याखेरीज तें चित्र कदापि पुसलें जाणार नाहीं.

कित्येक अवनत देशांची अशी स्थिति असते कीं, त्या देशाचे पुढारी स्वार्थत्यागात किंवा परिश्रमात यत्किंचितही कसूर करीत नाहींत, परतु त्या देशाचें खरें दुखणें कोणतें हेंच बरोबर न कळल्यामुळें त्या स्वार्थत्यागी पुरुषांचे श्रम फलद्रूप होत नाहींत हिंदुस्थानच्या रोगाचें अगदीं नक्की निदान करण्याचें कार्य दादाभाईंनीं केलें त्यांच्या अभ्यासामुळें व मेहनतीमुळें हिंदी राजकारणाला अगदीं पूर्ण निश्चित स्वरूप प्राप्त झालें आहे " हिंदुस्थानातील निरक्षरता, दारिद्र्य, दुष्काळ या सर्वांच्या मुळाशीं एक गोष्ट आहे, ती ही कीं, हिंदुस्थानचा कारभार पाहणारे नोकर परकी असतात " हा सिद्धात दादाभाईंनीं काढल्यामुळें कोणत्या दिशेनें कार्य करावयाचें असा प्रश्नच आता उरला नाहीं 'परकी नोकर' या मूलभूत दुष्ट प्रकाराविरुद्ध दादाभाईंनीं ५२ सवत्सरें ओरड केली त्यांनीं इतका पत्रव्यवहार केला, इतकीं व्याख्यानें दिलीं, इतके वादविवाद केले कीं, आज घटकेला सरकारशीं भाडताना हिंदी पुढारी जे जे मुद्दे पुढें आणतात ते सर्व दादाभाईंनीं पूर्वीच वापरले आहेत अशी एकही गोष्ट नाहीं कीं, जी दादाभाईंनीं बोलावयाची ठेविली आहे. भाडणाच्या कामांत त्यांनीं अगदीं कळस गांठला. त्यांच्या मागून येणाऱ्या पुढारी लोकाना आतां नवें बोलणें शक्यच नाहीं, त्यांनीं आतां काय करावयाचें तें करून दाखवावें. आणि त्यानीं काय करावयाचें तेंही दादाभाईंनीं स्पष्ट सागून टाकलें आहे

सन १९०६ सालीं कॉंग्रेसच्या अध्यक्षस्थानावरून दादाभाईंनीं 'हिंदुस्थानास स्वराज्य पाहिजे आहे' असें उच्च स्वरानें जाहीर केलें ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. त्या स्वराज्यमंत्राच्या उच्चारामुळें हिंदी राजकारणाला जोराचें चलन मिळालें विसाव्या शतकांतील हिंदी चळवळीच्या इतिहासाची पहिली पायरी तो उच्चार होय. दादाभाईंनीं स्वराज्याची मागणी केली म्हणूनच हिंदी चळवळीला तोंड

फुटलें नाहीं तर ती आणखी किती दिवस मूकवृत्तीने राहिली असती तें सांगवत नाहीं. सन १९०६ सालापूर्वीही सर्व हिंदी लोकांना वाटत होतें कीं, स्वराज्य असल्याशिवाय गत्यंतर नाहीं पण इंग्रज अधिकाऱ्यांच्या दडपशाहीची भीति स्वराज्याच्या उच्चाराच्या आड येत होती ही भीतीची भूल दादाभाईंनीं नाहींशी केली त्यांच्यासारख्या ज्ञानवृद्ध व तपोवृद्ध पुढाऱ्याच्याच तोंडून स्वराज्याचा मंत्र प्रथम बाहेर पडावयास पाहिजे होता सर्व जनतेच्या अंत:करणांत गुदमरलेल्या स्वराज्याच्या इच्छेला दादाभाईंनीं मूर्त स्वरूप दिले आणि हिंदुस्थानचें खरें ध्येय कोणतें तें जगाला जाहीर केले

दादाभाईंचें कार्य इतकें विविध व विस्तृत आहे कीं, त्या कार्याचें पूर्ण वर्णन करणें शक्य नाहीं थोडक्यात सांगावयाचें म्हणजे आज हिंदी लोकांच्या राजकीय चळवळीला जे काहीं किंचित् आशाजनक स्वरूप आलेलें आपणास दिसतें तें स्वरूप दादाभाईंनीं प्राप्त करून दिले आहे आजचा 'नवा हिंदुस्थान' दादाभाईंनीं घडविला आहे दादाभाईंनीं आपल्या देशबांधवांना इतकें ऋणी करून ठेविलें आहे कीं, त्यांच्या सेवेचा मोबदला देण्याचा हिंदी लोकांनीं आटोकाट प्रयत्न केला तरी, क्षीरनिधींत जन्मून श्रीशंकराच्या शिरोभागीं विलसणाऱ्या दिव्य चंद्राकडे पाहून मोठ्या कृतज्ञतेनें उपवस्त्राच्या काठाची एक दशी त्याच्याकडे फेंकणाऱ्या भाविक माणसाच्या प्रयत्नाइतकाच तो हास्यास्पद ठरेल

> **जन्म क्षीरनिधौ तथैव विपुलं पीयूषपूर्णं वपु:**
> **संतापार्तिहर हरस्य शिरसि स्थानं सदा सुन्दरम् ॥**
> **तारानाथ निशामुखैकतिलक ख्यातौषधीनां पते ।**
> **चन्द्र त्वां वसनाञ्चलस्य दशया संभावयामः कथम् ॥१॥**

[ संपूर्ण ]

# दादाभाईंची पत्रिका

दादाभाई पार्शी सनाच्या ११९४ सालीं दहाव्या महिन्याच्या २३ व्या दिवशीं जन्मले म्हणजे, शालिवाहन शकाप्रमाणें शके १७४७ मध्यें त्यांचा जन्म झाला, किंवा इंग्रजी सनाप्रमाणें इसवी सन १८२५ सप्टेंबरच्या ४ तारखेस त्याचा जन्म झाला, असें म्हणता येईल. ते मध्यरात्रीं जन्मले

दादाभाईंसारख्या थोर पुरुषाची पत्रिका पाहण्याची आमच्या वाचकास साहजिक उत्सुकता असेल खालीं दिलेली निरयन पत्रिका दादाभाईंची आहे.




वरील निरयन पत्रिकेवरून काय अनुमानें काढतां येतात तीं फलज्योतिष्याच्या साहाय्यानें वाचकांनीं पहावीं.

ॲलन लिओ हे प्रसिद्ध युरोपिअन ज्योतिषी "मॉडर्न ॲस्ट्रॉलजी" नांवाचें मासिक काढीत असत. त्यांनीं १९१४ सालच्या एप्रिल महिन्याच्या आपल्या मासिकाच्या अंकांत दादाभाईंची पत्रिका सोडविली आहे. ते म्हणतातः—

१ मंगळाच्या स्थितीवरून हा मनुष्य प्रगति व स्वातंत्र्य यांसाठीं रात्रंदिवस तळमळणारा असला पाहिजे असें दिसतें; व आपल्या कार्यासाठीं हा पुरुष मरणापर्यंत नेटानें झगडत राहणार असेंही मंगळाची स्थिति दर्शविते.

२ चंद्र व शनि यांच्या स्थितीवरून दादाभाईचें अलौकिक बुद्धिसामर्थ्य उघड होतें

३ शनि व गुरु असें दाखवितात कीं, दादाभाई मोठे आयुष्मान् व अत्यंत पवित्र आचरणाचे असले पाहिजेत

परिशिष्ट—२

# दादाभाईच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या गोष्टी

| | |
|---|---|
| १ जन्म | ४ सप्टेंबर १८२५ मुंबई |
| २ गणित व शास्त्रविषयाचे पहिले हिंदी प्रोफेसर | १८५४ |
| ३ कामा कंपनीतर्फे इंग्लंडची पहिली सफर | १८५५ |
| ४ लंडन येथील युनिव्हर्सिटी कॉलेजांत गुजराथीचे प्रोफेसर | १८५६ |
| ५ सिव्हिल सर्व्हिसच्या भांडणाचा प्रारंभ | १८५९ |
| ६ बडोद्याचे दिवाण | १८७४ |
| ७ मुंबई कार्पोरेशनचे सभासद | १८७५ व १८८१ |
| ८ मुंबईच्या कायदेकौन्सिलचे सभासद | १८८५ |
| ९ कॉंग्रेसची स्थापना | डिसेंबर १८८५ |
| १० पार्लमेंटमध्यें शिरण्याचा पहिला प्रयत्न | जुलई १८८६ |
| ११ कॉंग्रेसचे अध्यक्ष | १८८६ कलकत्ता |
| १२ पार्लमेंटांत निवडून आले | १८९२ |
| १३ कॉंग्रेसचे अध्यक्ष | १८९३ लाहोर |
| १४ इंटरपार्लमेंटरी हेग परिषदेचे सभासद | १८९४ |
| १५ रॉयल कमिशनचे सभासद | १८९५ |
| १६ वेल्बी कमिशनपुढें साक्ष | १८९७ |
| १७ कॉंग्रेसचे अध्यक्ष | १९०६ कलकत्ता |
| १८ विश्रांतीसाठीं वरसोवा येथें गेले | १९०८ |
| १९ प्रकृति एकदम अतिशय बिघडली | २९ मे १९१७ |
| २० देहावसान | ३० जून १९१७ मुंबई |

परिशिष्ट—३

# दादाभाईंचीं मुख्य मुख्य व्याख्यानें

| विषय | स्थळ | तारीख |
|---|---|---|
| १ " लॉर्ड रिपन " | मुंबई | २९ नोव्हेंबर १८८४ |
| २ पहिल्या कॉंग्रेसमधील भाषणें | ,, | डिसेंबर १८८५ |
| ३ " अफूचा व्यापार " | लंडन | १५आक्टोबर१८८६ |
| ४ दुसऱ्या कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून केलेलें भाषण | कलकत्ता | डिसेंबर १८८६ |
| ५ तिसऱ्या कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून केलेलें भाषण | लाहोर | डिसेंबर १८९३ |
| ६ पार्लमेंटमधील पहिलें भाषण | पार्लमेंट | १४ ऑगस्ट १८९४ |
| ७ ,, दुसरें ,, | ,, | १२ फेब्रुवारी१८९५ |
| ८ ,, तिसरें ,, | ,, | २१ ,, ,, |
| ९ रॉयल कमिशनपुढील साक्ष | सुमारें | १८९५ |
| १० " ब्रिटिश लोकशाही व हिंदुस्थान " | लंडन | ४ जून १९०१ |
| ११ " हिंदुस्थानची दशा " | ,, | ३१जानेवारी१९०१ |
| १२ " दुष्काळाचें कारण व निवारण " | ,, | ३१ एप्रिल १९०१ |
| १३ " ब्रिटिश सत्तेखालील हिंदुस्थान " | ,, | २२ मार्च १९०२ |
| १४ " इंग्रजांचीं अभिवचनें " | ,, | १९०४ |
| १५ " आमची राष्ट्रीय सभा " | वेस्ट मिनिस्टर पॅलेस हॉटेल | नोव्हेंबर १९०४ |
| १६ " कर्झनसाहेबांची कारकीर्द " | कॅक्स्टन हॉल | मे १९०५ |
| १७ सन १९०६ सालच्या कॉंग्रेसचे अध्यक्ष म्हणून केलेलें भाषण | कलकत्ता | डिसेंबर १९०६ |

परिशिष्ट—४

# दादाभाईचे प्रमुख निबंध व लेख

**[अ] हिंदुस्थानच्या पैशाच्या व्यवहाराविषयीं—**

| | | |
|---|---|---|
| १ अबिसीनियाच्या लढाईचा खर्च | २९ नोव्हेंबर | १८८७ |
| २ इंग्लंड व हिंदुस्थान यामधील खर्चाची वाटणी | १५ फेब्रुवारी | १८९६ |
| ३ ब्रिटन व हिंदुस्थान यामध्यें पैशाचे संबंध कसे असावेत ? | २१ मार्च | १८९६ |
| ४ हिंदुस्थानविषयक खर्चाची व्यवस्था | आक्टोबर | १८९५ |
| ५ हिंदुस्थानची खंडणी | ३ एप्रिल | १९०५ |

**[आ] हिंदी व्यापाराविषयीं—**

| | | |
|---|---|---|
| ६ हिंदुस्थानचा व्यापार | १५ फेब्रुवारी | १८७१ |

**[इ] हिंदुस्थानच्या दारिद्र्याविषयीं—**

| | | |
|---|---|---|
| ७ हिंदुस्थानचें दारिद्र्य | २८ फेब्रुवारी | १८७६ |
| ८ हिंदी लोकांच्या गरजा | २७ जुलई | १८८० |

**[ई] हिंदुस्थानांतील अधिकाराच्या जागांविषयीं—**

| | | |
|---|---|---|
| ९ सिव्हिल सर्व्हिसमध्यें नेटिवांचा प्रवेश | ३ नोव्हेंबर | १८९७ |
| १० आय् सी एस्. व हिंदी लोक | १३ ऑगस्ट | १८६७ |
| ११ आय सी एस् मध्यें सुशिक्षित हिंदी लोकाचा प्रवेश | १७ ऑगस्ट | १८६८ |
| १२ ,, ,, ,, | २ मे | ,, |
| १३ इंडियन सिव्हिल सर्व्हिस | | १८८४ |

**[उ] हिंदुस्थान व इंग्लंड यांच्या परस्पर संबंधांविषयीं—**

| | | |
|---|---|---|
| १४ हिंदुस्थानासाठीं इंग्लंडनें काय केलें पाहिजे ? | २ मे | १८६७ |
| १५ रशियाच्या स्वारीचें भय | सप्टेंबर | १८९५ |

**[ऊ] हिंदी संस्थानांविषयीं—**

| | | |
|---|---|---|
| १६ म्हैसूर संस्थान | ५ जुलई | १८६७ |
| १७ बडोद्यांतील माझी दिवाणगिरी | २५ नोव्हेंबर | १८७५ |

# विषयसूचि

